






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

□ अंक क्र. ३३३ : एप्रिल ते जून २०१०

---






**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०
दूरभाष - ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह**
**महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.**

अक्षरजुळणी
**मेघा ग्राफिक सर्व्हिसेस,**
स.नं. १४/२३/४, घर नं. १५९८,
मोती बेकरीमागे, धायरी, पुणे - ४११ ०४१

मुद्रणस्थळ
**जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१० नांदेड फाटा,**
**सिंहगड रस्ता, पुणे - ४११ ०४१**

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : जून, २०१०

*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती,*
*सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*

## मुखपृष्ठाविषयी

## मराठी फार्सेस् (१८७० ते १८९०)

संपादक

मराठी रंगभूमीच्या इतिहासात संस्कृत आणि इंग्रजी नाटकांच्या प्रभावाने स्थित्यंतरे झालेली दिसतात. विष्णुदास भावेंच्या सूत्रधारप्रधान नाट्याविष्काराने इ. स. १८४३ पासून प्रारंभ झाला असे मानले जाते; परंतु पूर्वनियोजित संवादलेखन नसल्याने तो 'खेळ' केवळ गायकांवर अवलंबून होता. नाटकातील पदरचना, त्यांच्या चाली, सूत्रधार आणि त्याच्याबरोबर गायक-वादकांचा संच इ. सर्व पूर्व नियोजित होते. कथानक पौराणिक असल्याने रामाने, सीतेने, हनुमंताने आणि रावणाने काय बोलायचे, ते माहितीच असल्याने, उत्स्फूर्तपणे संवाद बोलले जात. परंतु १८७० ते १८९० ह्या कालखंडात मराठी फार्सेस् मधून सुसंघटित, पूर्व नियोजित संवादातून सामाजिक किंवा ऐतिहासिक विषय घेऊन, १०-१२ प्रवेशांच्या एका अंकाच्या मर्यादेत, नाट्याविष्कार सादर होत असे. मुख्य नाटकाच्या बरोबर हे प्रहसन सुरुवातीला सादर केले जात असे. 'ढोंगी बैरागी', 'चहाडखोर शास्त्री', 'मोर एल् एस् बी', 'स्वैर सकेशा', 'मनोरमा' इत्यादि फार्सेस् मधून समकालीन सामाजिक समस्यांची- (उदा. हुंड्याची प्रथा, विधवांची अनैतिकता इ. ची) नाट्यसंहिता असे.

मराठी फार्सेस्च्या सादरीकरणातून, नाट्यलेखन आणि रंगसूचनांनुसार सादरीकरण, यातील बदलाच्या पूर्व-पाऊलखुणा दिसतात. ऐतिहासिक नाटक आणि शोकपर्यवसानी नाटकांची बीजे मराठी फार्सेसनी प्रथम रुजविलेली दिसतात. त्यापैकी अफझलखानवध आणि श्रीमंत नारायणराव पेशवे यांच्या मृत्यूचा फार्स हे ऐतिहासिक फार्स; लक्षणीय आहेत.

नारायणराव पेशवे

यांच्या

मृत्यूचा फार्स.

मुंबई येथें

किंमत ८ आणे.

म. सा. पत्रिकेच्या ह्या (क्र. ३३३ च्या) अंकाचे मुखपृष्ठ हे 'श्रीमंत नारायणराव पेशवे यांच्या मृत्यूचा फार्स'च्या सन १८९५ मध्ये प्रकाशित झालेल्या दुसऱ्या आवृत्तीमधील पान नं. २ वरील आहे. सूत्रधार प्रधानतेकडून विविध पात्रांच्या सहभागाने, पूर्वनियोजित संवादाने, सादरीकरण कसे होऊ लागले; त्याचे ते बोलके चित्र आहे. 'सूत्रधार-नटी' ह्या ऐवजी 'सूत्रधार-विदूषक' ह्यांच्या प्रथम प्रवेशाने फार्सचा प्रारंभ होई. रंगभूमीवर हलकेफुलके वातावरण निर्माण करून प्रेक्षकांना स्थिरस्थावर करण्यासाठी हा प्रयोग असे. सूत्रधाराने गणपती आणि सरस्वतीला वंदन करून रंगमंचावर येण्याची प्रार्थना करणे, सरस्वती-गणेशाचे आगमन आणि 'आज आम्ही श्रीमंत नारायणराव पेशवेंच्या मृत्यूचा फार्स करून दाखवीत आहोत. तरी अभय असावे' असे सरळसरळ 'शोकान्तिका' सादर करण्यास सरस्वती-गणेश यांचे आशीर्वाद घेणे; यातून नाट्यसंहितेचे मोठे वळण दिसते. श्रीगणेश-सरस्वतींकडून आशीर्वाद-अभयदान घेतल्यावर, रंगभूमीवर मृत्यू दाखविण्याचे, तेही पेशवाईच्या इतिहासातील एक काळे-ठिक्कर पान- श्रीमंत नारायणरावांच्या मृत्यूची घटना दाखविण्याची, देवांकडूनच परवानगी; म्हणजे प्रेक्षकांची अनुमती गृहीत धरली. हा फार्स तेरा प्रवेशांमध्ये साकारला आहे. हे नवे वळण लावताना 'सूत्रधार प्रधान' प्रवेशाचा आदर केला आहे. मुखपृष्ठावरील चित्र शंभर वर्षांपूर्वीचे रेखाचित्र आहे. मंगलाचरण झाल्यावर, गणपती आणि सरस्वती यांनी रंगमंचावर येऊन सूत्रधाराला आशीर्वाद देण्यापूर्वी विदूषकाचा प्रवेश होतो. सूत्रधार आणि विदूषक यांचा हलकाफुलका संवाद होतो.

सूत्रधार - अरे तुझे नाव काय ?...

विदूषक - अहो नर्मदेच्या अलिकडे कोणता शक. (?)

सूत्रधार - विक्रम शक.

विदूषक - त्याच्या पलिकडे (?)

सूत्रधार - शालीवाहन शक.

विदूषक - त्यांच्यामधे हा विदूषक ! (उडी मारतो)---

ह्या अंकाच्या मुखपृष्ठावरील चित्रात गणेश-सरस्वती-सूत्रधार-विदूषक, गायनाचे साथीदार आणि समोर बसलेले प्रेक्षक (सभासद) दिसत आहेत. सोबत उजव्या बाजूला ह्या पुस्तकाचे पहिले पान आहे.

- संपादक



अनुक्रमणिका

संपादकीय

# नाट्यसमीक्षेचे अर्धशतक

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

मराठी नाट्यसमीक्षेत गेली ५० वर्षे डॉ. वि. भा. देशपांडे यांनी आपली नाममुद्रा ठसविली आहे. त्यात आजही निरीक्षक-परीक्षक-मार्गदर्शक-हितचिंतक वक्ता, समीक्षक, संपादक, संकलक, संयोजक, संवादक, समन्वयक, संशोधक आणि साक्षी म्हणून त्यांनी मिळेल त्या भूमिकेतून नाट्यरसाचा आस्वाद घेतला; आणि दिला. या मार्गांनी त्यांची नाट्यसमीक्षा बहरली आणि आस्वादकांसाठी सदाहरित राहिली आहे. 'विभां'नी नाट्यसमीक्षेला परिभाषेच्या बोजड शब्दात अडकवली नाही. आपल्या समीक्षेला ते नाट्यमुशाफिरी, नाट्यप्रवास, नाट्यदिंडीचा भोई आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे रंगभूमीवरील आनंदयात्रा समजतात. वयाच्या ७२ व्या वर्षापर्यंत आपले 'जीवित' म्हणून, ही आनंदयात्रा जगत आहेत. त्याला ते 'उपजीविका' म्हणत नाहीत. आपले लेखन हे ललित लेखन नाही; अथवा लोकप्रिय लेखन नाही. एका नाट्याभ्यासकाची भूमिका घेताना आपल्याला केवळ आनंद मिळाला नाही; तर समग्र जगण्याचं भान एक 'प्रयोजन' मिळालं ! नोकरी-व्यवसाय ही उपजीविका, ह्या 'प्रयोजना'पुढे गौण होती; म्हणूनच सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजमधील कायम-स्वरुपी-सुरक्षित आर्थिक आधार देणारी नोकरी सोडून पुण्यात 'मॉडर्न कॉलेजमधील' परिवीक्षाधीन नोकरी स्वीकारली; ती 'नाट्यजीवित' समृद्ध करण्यासाठी ! निम्नमध्यमवर्गीय कुटुंबातील कोणत्याही तरुणाला, हा आर्थिक धोका स्वीकारण्याचे धाडस, परवडणारे नव्हते परंतु 'विभां'च्या नाट्याभ्यासाने हे स्वीकारले. ज्ञान-विज्ञान-कला-संगीत यांच्या माहेरघरी-पुण्यात 'विभा'नी मनसोक्त मुशाफिरी केली; आणि नाट्यरसाला शब्दांकित करण्यासाठी समीक्षामार्गावर 'नाट्यप्रमेयांची उद्याने' निर्मिली. मराठी नाटकाच्या पहिल्या शतकापासून ते स्वातंत्र्योत्तर मराठी नाटकातील बहुविध नाटककार, नट, त्यांच्या भूमिका यांच्यावरील अभ्यासपूर्ण स्वतंत्र १८ ग्रंथ. नाट्यलेखन, दिग्दर्शन, नाट्यप्रयोगाचे रंगधर्मी-रंगकर्मी म्हणून इ. असंख्य मार्गांनी अनुभवलेले, ४२ संपादित ग्रंथ अशी ग्रंथसंपदेची 'साठी' नाट्यसमीक्षेच्या अर्धशतकाच्या वाटचालीत ग्रंथरूपाने साक्षात् झालेली आहे. याशिवाय रंगायन, पीडीए, पुरूषोत्तम करंडक, सवाई गंधर्व महोत्सव इ. बहुविध संस्थात सक्रिय सहभागी होताना, नाट्यक्षेत्रातील अनेक दिग्गजाच्या संपर्कात आल्यामुळे संगीत-साहित्य-कला-जाणीवांचा जवळून परिचय झाला. के. नारायणराव काळे, शिवराम कारंथ, शंभूमित्र, आचार्य अत्रे, पु. ल. देशपांडे, विजय तेंडुलकर, जब्बार पटेल, विजया मेहता, अरविंद देशपांडे, भालबा केळकर, श्रीराम लागू, प्रभाकर पणशीकर, मास्टर दत्ताराम, वसंतराव देशपांडे, प्रा. शं. गो. साठे, व्यंकटेश माडगूळकर, य. न. केळकर, ग. वा. बेहेरे, संगीतकार पं. जितेंद्र अभिषेकी, भास्कर चंदावरकर, दादा कोंडके, निळू फुले, राम शेवाळकर इत्यादि श्रेष्ठ कलावंतांशी संवाद साधल्याचे भाग्य



लाभले. रंगायन, पीडीए, चंद्रलेखा, गोवा हिंदू असोसिएशन इ. एक-से-बढकर-एक नाट्यसंस्थांशी संबंध जोपासले. अनेक दर्जेदार स्मरणिकांचे संपादन केले. साहित्यसूची सारख्या नियतकालिकाच्या अतिथी संपादनाची जबाबदारी सांभाळली. या निमित्ताने अनेक रंककर्मींशी, रंगधर्मींशी संवाद साधला. याशिवाय मुंबई आकाशवाणीवर-मराठी संगीतनाटकावर १६ भागाचे मालिका-लेखन, प्रतिमा आणि प्रतिभा ह्या दूरदर्शन मालिकेत शिलेदार, भास्कर चंदावरकर, वसंत शिंदे, बापूराव माने इ. रंगकर्मींच्या मुलाखती घेतल्या. पु. ल. देशपांडे, प्रभाकर पणशीकर, श्रीराम लागू, अमोल पालेकर, निळू फुले यांच्या जाहीर मुलाखती घेतल्या. दिल्ली ते गोवा या दरम्यानच्या प्रमुख शहरात नाट्यविषयांवर व्याख्याने दिली.

**मराठी नाटक-नाटककार : काळ आणि कर्तृत्व :**

ह्या सर्व अनभुवांचे संचित घेऊन 'विभां'नी आपली नाट्यसमीक्षा समृद्ध केली. आपल्या ४० ग्रंथांचे अनुभव गाठीशी घेऊन 'मराठी नाटक-नाटककार : काळ आणि कर्तृत्व' ह्या ग्रंथाचे त्रिखंडात्मक लेखन, एकूण १७०० पृष्ठांमध्ये बांधून, एक मोठा संदर्भग्रंथ 'विभां'नी मराठी साहित्याला वहाल केला. आपल्या नाट्यसमीक्षेच्या लेखनकार्याचा जणू कळसाध्याय लिहिला. पहिल्या खंडात- विष्णुदास भावे ते राम गणेश गडकरींपर्यंत, दुसऱ्या खंडात- भा. वि. वरेरकर ते विजय तेंडुलकर आणि तिसऱ्या खंडात- १९६० नंतरच्या नाट्यप्रवाहातील नाटके असा इ. स. १८४३ ते २००० सुमारे १५० ते १६० वर्षांचा कालखंड विचारात घेतला आहे. ह्या काळातील नाट्यसृष्टीला प्रभावित करणारी नाटके आणि नाटककार यांचे सविस्तर विवेचन आहे. हे विवेचन करताना सामान्य नाट्यरसिकाला 'वि भां'नी आपल्या नजरेसमोर ठेवल्याने, समीक्षेच्या जटिल चर्चेत ते शिरले नाहीत. असे असले तरी, नाट्यपरंपरेचा आणि विकासाचा सुमारे १५० वर्षांचा कालपट उलगडणारा हा दस्ताऐवज आहे.

**आस्वादक समीक्षा**

१५० वर्षांचा विशाल कालपट उलगडताना केवळ आस्वादकाची भूमिका घेतलेली नाही. नाटक आणि नाटककार यांच्या कालकर्तृत्वाचा आलेख मांडताना 'विभां'नी- नाटकाचे आणि समाज-संस्कृतीचे नाते उलगडले आहे. आस्वादक समीक्षा ही अखेर विश्लेषणात्मक आणि मूल्यमापनात्मक असते. ही आस्वादक समीक्षेची एक प्रक्रिया आहे. समीक्षेचे स्वरूप मूलतः आस्वादकच असले पाहिजे असे मिलिंद मालशे म्हणतात; ते नाट्यरूपाची समीक्षा करताना पटतेच. 'विभां'नी हाच मार्ग स्वीकारला ! आस्वाद घेता घेता 'समीक्षा' हा एक शोध असतो. नाटक आणि नाटककारांचा, तसेच प्रेक्षक-समीक्षकांचा आणि आपला स्वतःचाही! अनेक प्रकारे नाट्यसंस्कार घेत घेत 'विभां'नी स्वतःतला नाट्यसमीक्षक शोधला.

तंजावरी नाटके, व्यंकोजी राजे भोसले, शहाजी राजे भोसले पासून ते पीडीए च्या नाट्यपरंपरेचा विशाल कालपट आणि त्यातील ठळक-नाटक नाटककार यांचा धांडोळा घेताना त्या त्या काळातील साहित्यमूल्ये-रंगमूल्ये (प्रयोगमूल्ये), संहितेतील गुणदोष, नाट्यशैली, प्रेक्षकांची आवडनिवड, यांची चर्चा अपरिहार्यपणे आली आहे. नाट्यपरंपरेच्या पहिल्या कालखंडात- विष्णुदास भावेंची सूत्रधारप्रधान नाटके, 'यक्षगान'चा प्रभाव, दशावतारी खेळ 'संस्कृत



नाट्यरचनेचा प्रभाव (सूत्रधार-नटीप्रवेश-नटराज स्तवन-कथानकाचे घडणे- अनेक प्रवेशी आणि किमान सहा अंकात विस्तारलेले कथानक - भरतवाक्य), बुकिश नाटके (भाषांतरित आणि रूपांतरित नाटके) विशेषतः शेक्सपियरच्या नाटकांचा आणि कालिदासादि संस्कृत नाटकांचा प्रभाव दिसून येतो. अभिजात कलाकृतींचा हा प्रभाव पहिल्या सुशिक्षितांच्या पिढीवर होता. त्यामुळेच भाषांतरित नाटकात कृ. शा. राजवाडेंचे 'मालती-माधव', ग. शा. लेलेंचे मालविकाग्निमित्र, परशुरामपंत तात्या गोडबोलेंचे- वेणीसंहार इ. अभिजात संस्कृत नाट्यकलाकृतींबरोबरच शेक्सपियरचे 'ऑथेल्लो' महादेव शास्त्री कोल्हटकर यांनी मराठी साहित्यात आणले. आ. वि. पाटकरांनी मर्चंट ऑफ व्हेनिस (स्त्री न्याय चातुर्य), का. गो. नातू यांचे ज्युलियस सीझर (विजयसिंग) इत्यादि नाटकांनी नाट्यसंहितेचे वहुविधत्व भाषांतराच्या मार्गाने आणले. ह्या भाषान्तर युगानंतर 'मराठी फार्सेस्' (१८६५ ते १८९०) च्या स्वतंत्र नाट्यरचनेचा प्रारंभ काळ आणि स्वतंत्र सामाजिक विषयांची नाट्यसंहिता म. बा. चितळेंच्या 'मनोरमा' (१८७१), विधवांच्या कोंडमाऱ्याचे 'स्वैरसंकेशा', 'मोर एल्एल्बी हुंडा प्रहसन' याबरोबरच शोकांत कथानकांचाही प्रथम प्रवेश - नारायणराव पेशवेंचा वध, अफझल खानाचा वध या फार्सेसच्या रूपाने मराठीत झाला. फारसी थिएटर, झोरोस्ट्रियन थिएट्रिकल चा कालखंड (१८७६)-

मराठी नाटकाने स्वतःचे असे सुसंघटित- रूप धारण करताना ज्या वळणावळणांनी मार्गक्रमणा केली. त्याचा नेमका आढावा घेऊन किर्लोस्कर, देवल, खाडिलकर अशी नाट्यपरंपरा जी सुरू झाली ती विविध नाटक मंडळ्यांच्या अथक प्रयत्नांनी कशी विकसित केली; त्याचे त्रिखंडात्मक सिंहावलोकन वाचनीय आहे. वाचकनिष्ठ आहे. नाट्यमन्वंतर, वरेरकर-अत्रे-रांगणेकर-शिरवाडकर-कानेटकर-पु. ल. देशपांडे-खानोलकर-तेंडुलकर पर्यंत दुसरा कालखंड आणि विश्राम बेडेकर-जयवंत दळवी-मतकरी-बाळ कोल्हटकर-विद्याधर गोखले-श्री. ना. पेंडसे-दारव्हेकर-विद्याधर पुंडलिक-व्यंकटेश माडगूळकर-शं. ना. नवरे-खरे-भावे- गो. नी. दांडेकर-शं. गो. साठे-मधुकर तोरडमल-अनिल बर्वे-श्री. ज. जोशी-गो. गं. पारखी-मधुसुदन कालेलकर इत्यादि नाट्यधर्मींचे बोट धरून तिसऱ्या कालखंडाची मुशाफिरी साकारली आहे.

'वि. भां'नी ह्या त्रिखंडात्मक नाट्यप्रकल्पाला 'मुशाफिरी' नाव दिल्याने त्याला समीक्षेच्या आणि समीक्षकांच्या चिकित्सेतून मोठ्या चातुर्याने अलिप्त ठेवले आहे. वाचकांपर्यंत नाटक पोहोचवावे- यासाठी नाटकाच्या इतिहासाला इ. स. २००० पर्यंतचे बंधन घालून घेतले आहे. हा इतिहास नाही; असे ते म्हणत असले तरी 'थोर माणसांची चरित्रे' हा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष इतिहासच असतो. गाजलेली नाटके, गाजलेल्या भूमिका, गाजलेला नाट्यकाळ, गाजलेले रंगधर्मी ह्या 'भाष्यकाराते वाट पुसतु' मार्गाने, एक सुसंगत नाट्यपरंपरा, एक मोठा कालपट उलगडत नेल्याने तो नाट्यपरंपरेचा इतिहाससापेक्ष दस्तऐवज निर्माण झाला आहे.

**नाटक नावाचं बेट**

हे आत्मचरित्रात्मक लेखन म्हणजे- 'विभां'च्या नाट्यजीविताचे इतिहाससापेक्ष वास्तव आहे. आत्मचरित्र म्हणजे जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या घटनांची जंत्री नव्हे ! ज्यांच्या जीवनात सांगण्यासारखे काही घडते- आणि ते घडलेले केवळ व्यक्तिगत नसून समाजाचे भान ठेवून, अल्पसे का होईना सामाजिक असते- ते समाजात प्रकाशित करणे नैसर्गिक न्यायतत्त्वाला धरून असते. हे नैसर्गिक न्यायतत्त्व 'विभां'नी पाळले आहे. 'आधी केले; मग सांगितले'. आणि समर्थ रामदासांनी म्हटल्याप्रमाणे 'अभ्यासे प्रकटवे ॥' हे ते नैसर्गिक न्यायतत्त्व आहे. पन्नासच्या वर, नाटकाला वाहिलेली ग्रंथसंपदा त्यांनी निर्मिली. नाट्यकोशाचा बृहत्-प्रकल्प अनेक अडथळ्यांना पार करून साकारला. याबद्दल विभांना वेळोवेळी यथोचित सन्मान लाभले. एका अर्थाने 'विभां'चे नाट्यजीवित कृतार्थ झाले !

नाटक नावाच्या बेटावर 'विभा' हे तसे -न-नायक (अँन्टी हीरो) आहेत. ह्या बेटावर पाऊल ठेवताना

कोणतीही कौटुंबिक परंपरा त्यांच्या पाठीशी नव्हती. जेथे ''रामनाम'' तेथे हनुमंत ! ह्या श्रद्धेनुसार जेथे 'नाटक' तेथे 'विभा' धावत गेले. ह्या 'पंचमवेदा'विषयी काही ऐकायला-पहायला मिळेल ह्या आंतरिक उत्कटतेने त्यांनी मिळेल ती भूमिका आनंदाने स्वीकारली. कधी स्तंभलेखनाचे काम असो, कधी के नारायण-काळेंसारख्या नाट्यमहर्षींचे 'लेखकु' म्हणून तर कधी 'रंगायन'चे सभासद नोंदणी बुक घेऊन वर्गणी गोळा करणारे स्वयंसेवक म्हणून, त्यांनी निरपेक्ष उमेदवारी केली. ह्या क्षेत्रातला आपला मित्र परिवार त्यांनी किती सहजतेने गोळा केला- ती श्रीमंती, त्यांच्या 'मराठी नाटक-नाटककार : काळ आणि कर्तृत्व' ह्या त्रिखंडात्मक प्रकल्पाच्या प्रकाशन समारंभ-प्रसंगी दिसून आली. मराठी नाट्यसृष्टीतले सगळे आघाडीचे कलाकार व समीक्षक आवर्जून 'विभां'वरील प्रेमाने जमले होते. दिलीपराज प्रकाशनचे मालक श्री. व सौ. बर्वे ह्यांनी ह्या प्रकाशन समारंभाची तारीख, 'विभां'च्या सत्तराव्या वाढदिवसाची ठेवून, खूप मोठे औचित्य साधले होते. एक नाट्यसंमेलनच, या निमित्ताने घडवून आणले.

ह्या आत्मचरित्रात्मक लिखाणाला 'विभां'नी कैफियतीचे स्वरूप येऊ दिले नाही. तसे ते येण्याचे कारणही नाही; कारण त्यात लपविण्यासारखे काहीच नाही. जेव्हा समाजासमोर आपली एक छबी बेतून दाखवायची वेळ येते त्यावेळी नको असलेला भाग छिन्नी-हातोड्याने वेगळा करून, कलानिर्मितीचे कौशल्य प्रकट होते. ती प्रतिमा किंवा छबी, शिल्पकाराच्या कलेने, प्रेक्षकांना आकर्षित करते. शिल्पकारही तटस्थ वृत्तीने एकाच दगडातून हत्तीचे आणि माकडाचे शिल्प कोरू शकतो. 'विभां'च्या बाबतीत- आत्मचरित्र लेखन- करताना- ही समस्या उपस्थित होऊच शकत नाही. कारण त्यांनी आत्मचरित्रलेखनाचा निवडलेला कालखंड हा त्यांच्या जीवनाचे 'हार्द' आहे. त्यामुळे 'दुरूस्त प्रतिमा' कोरण्याचा, कलाकौशल्याचा, भाग नव्हताच ! 'विभां'नीही अकारण 'भावुक' होऊन लिहिण्याचे कारण नव्हते. तसे त्यांनी केलेही नाही. आत्मचरित्र लिहिताना, जे सत्य सांगायचे, ते जर नेहमीच्या वाटेचे नसेल; तर ते वाचनीय होते.

'विभा' एक नाट्य समीक्षक म्हणून कसे वडत गेले; त्याचा हा अनेक वळणांचा प्रवास आहे. स्वतःलाच स्वतःचा लागलेला तो शोध आहे. त्यांनी नाटकात छोट्या-मोठ्या भूमिका केल्या. परंतु प्राध्यापक म्हणून काम करताना नाटक नावाच्या बेटाकडे ते ओढले गेले. अनेक वाङ्मय प्रकाराचे अध्ययन-अध्यापन करताना नाट्य-क्षेत्राकडेच का ओढले गेलो ? असा स्वतःलाच प्रश्न विचारून त्याचे उत्तर शोधण्याचा निरर्थक काथ्याकूट करीत ते बसले नाहीत. मनाच्या ऊर्मीने मिळालेली 'धार' आणि मिळालेला 'काठ' यांच्या आधाराने त्यांनी स्वतःतला समीक्षक घडविला. आत्मचरित्र-लेखनाचे हे नैसर्गिक 'स्वयंभू'पण विलोभनीय असते. निसर्गाचे सगळे सौंदर्यघटक एकत्रित आणून एक निसर्गचित्र रंगविणे म्हणजे बगीचा! असे 'बगीचे' खूप असतात. परंतु योगायोगाने हे सौंदर्यघटक एके ठिकाणी येऊन चिरंतन आनंदाचे साक्षीदार होतात, असे स्वयंभू निसर्ग स्थळ- 'विभां'चे बेट ! 'विभां'नी आपल्या जीवनाचे एक जीवित, 'नाट्यजीवित', एवढाच 'कॅनव्हास' घेऊन आत्मचित्र रंगविले. ते प्रामाणिक झाले ! माझे सगळे जीवनच आगळे-वेगळे आहे अशा भ्रामक कल्पनेने ते लिहिलेले नाही. की; आपल्या जीवनानुभवाला कुरवाळीत जागोजागी 'गहिवर' दाटून येऊ दिले नाहीत. स्वतःतील नाट्यसमीक्षक ओळखला; आणि तो घडत-घडवित कशी नाट्यमुशाफिरी केली त्याचे हे संयत चित्रण 'नाटक नावाचे बेट' !

संपर्क : ७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर. दूरभाष : ०२४१-२४२९७५५

(संपादक)
(महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे ३०)



अनुक्रमणिका

# संगीतमय नाट्याविष्कार – नांदी ते भरतवाक्य

## (संगीत मानापमानच्या शताब्दीनिमित्त–)

धनश्री खरवंडीकर

*[ शास्त्रीयसंगीत आणि नाट्यभाव यांचे शुद्धस्वरूपी नाते, अतूट आहे. ते नाते शब्दमाध्यमातून प्रकटताना विशेषतः नाट्यसंगीताने अधिक प्रभावी नाट्याविष्कार घडविला. ह्या नाट्याविष्काराचे रसिकांना वेड लावणारे 'गंधर्वयुग' प्रकटले. हरदासी कीर्तनातील दिंड्या, साक्या, कामदा, अंजनीगीते यांनी भारलेले 'किर्लोस्कर–युग' रसिकांनी अक्षरशः डोक्यावर घेतले. नाटकाला शास्त्रीय संगीताची जोड देऊन उपशास्त्रीय नाट्यसंगीत प्रकटले; ते खाडिलकरांच्या नाट्यसंगीतातून ! १०० वर्षे पूर्ण झालेल्या 'संगीत मानापमानाची' गोडी आजही अवीट आहे; ती त्यातील अविस्मरणीय उपशास्त्रीय संगीत म्हणून नव्याने प्रकटलेल्या नाट्यसंगीतानेच ! जीवनातील नाट्य–प्रकटीकरणाची ही विदग्ध संगीतमय वाटचाल नाट्येतिहासातील सुखकारक हिरवाळी आहे. नाट्यगीतांनी नाट्यसंहितेतील नाट्यछद्माची आल्हादक जपणूक करून नाट्याविष्काराला अजरामर केले आहे. संगीत मानापमानाच्या शताब्दी–निमित्ताने ह्या संगीतमय नाट्याविष्काराचे, हे सहित्याच्या नजरेने केलेले सिंहावलोकन !*

*– संपादक ]*

१२ मार्च १९११ रोजी मुंबईच्या ग्रॅण्टरोडवरील रिपन थिएटरमध्ये नाट्याचार्य कृष्णाजी प्रभाकर खाडिलकरलिखित 'संगीत मानापमान' या त्यांच्या (खाडिलकरांच्या) पहिल्या संगीत नाटकाचा शुभारंभाचा प्रयोग जाहीर झाला. नाट्यरसिकांना नवीन नाटकाचे आकर्षण इतके होते की, काही तासातच या नाट्यप्रयोगाची सर्व तिकिटे विकली गेली; आणि 'हाऊसफुल्'चा फलक लावला गेला. नाटक सुरू होण्याची वेळ झाली. रंगमंदिरातील मखमली पडद्याची पूजा होऊन त्याला हार घातला गेला. धुपाचा सुगंध सर्वत्र दरवळला आणि तिसरी घंटा होऊन रसिकांना उल्हसित करणारे भारदस्त 'नमन नटवरा'चे सूर उमटू लागले ! नाटकाला सुरुवात झाली. याच नांदीचे आणि त्यातील लोकप्रिय पदांचे अविस्मरणीय सूर आजही त्याच्या जन्मशताब्दी वर्षात आपण प्रयोगांच्या मैफिलींच्या माध्यमातून ऐकू शकतो, पाहू, अनुभवू शकतो; ही आपल्या सर्वांच्या दृष्टीने खरोखरीच भाग्याची गोष्ट आहे. 'संगीत मानापमान' नाटकाच्या जन्मशताब्दी निमित्त त्यातील काही पदांचे साहित्यिक आणि सांगीतिक असणारे कलात्मक सौंदर्य प्रस्तुत लेखात विचारात घेणार आहोत. 'संगीत मानापमान' हे नाटक सांगीतिक दृष्टीने अत्यंत उच्च कलाकृती ठरते; याची साक्ष 'खरा तो प्रेमा' 'नयने लाजवित', 'दे हाता, या शरणागता', 'शूरा मी वंदिले', यांसारखी अवीट गोडीची पदे देतील. परंतु या पदांच्या साहित्यिक दृष्टिकोनातूनही ही कलाकृती अत्यंत श्रेष्ठ दर्जाची ठरते यासंदर्भात विचार करणे आवश्यक आहे.

**पार्श्वभूमी -**

खाडिलकर हे मुळात गद्य नाटककार आणि पत्रकार होते. त्यामुळे त्यांची 'भाऊबंदकी', 'कांचनगडची मोहना', 'कीचकवध' यांसारखी गद्य नाटके त्या काळात अतिशय गाजत होती. परंतु बालगंधर्वांच्या भूमिका बघून नाटककार कृ. प्र. खाडिलकर यांना संगीत नाटक लिहिण्याची स्फूर्ती मिळाली. परिणामी १९११ साली त्यांनी 'संगीत मानापमान' या त्यांच्या पहिल्या संगीत नाटकाची निर्मिती केली; आणि याच नाटकाच्या यशस्वीतेने नाट्यसंगीतात क्रांतिकारक बदल घडून आले. किर्लोस्करी-नाट्यसंगीतापेक्षा वेगळा बाज खाडिलकरी नाट्यसंगीतात आणला गेला. 'मानापमाना'पूर्वीच्या बहुतांश नाटकातून वृत्त आणि छंदात्मक पद्यरचना आणि हरिदासी कीर्तनातील संगीताचा वापर स्पष्टपणे दिसून येतो. परंतु 'मानापमान' नाटकाच्या संगीत-दिग्दर्शनातून अशा पद्यरचना आढळून येत नाहीत. या नाटकातून शास्त्रीय आणि उपशास्त्रीय संगीताच्या मूळ बंदिशींआधारे यातील पद्यरचनांना चाली लावण्यात आल्या आहेत. 'मानापमान' नाटकातील संगीताची बाजू कुशल हार्मोनियमवादक संगीतज्ज्ञ गोविंदराव टेंबे यांनी सांभाळली होती. त्याआधीच्या काळात स्वतः नाटककारच संगीत देत असत. त्यात

मुख्यतः साक्या, दिंड्या, कामदा, अंजनीगीते यांचा वापर असे. कथानकाचा अविभाज्य भाग म्हणून संगीत येत असे. परंतु पहिले संगीत-दिग्दर्शक म्हणून टेंबे यांनी 'मानापमान'त खास संगीतासाठीच संगीताचे आयोजन केले. वेगळा संगीतदिग्दर्शक नेमण्याची प्रथा 'मानापमाना' पासूनच सुरू झाली. नाट्यसंगीतात 'शाकुंतल'ने पहिली क्रांती घडविली, तर 'मानापमान'ने दुसरी क्रांती घडविली, असे मानण्याइतके महत्त्वाचे बदल 'मानापमान'च्या संगीत योजनेने केले. केवळ रागाचीच नव्हे; तर योग्य चालींची निवड हे या संगीतयोजनेचे वैशिष्ट्य म्हणता येईल. कारण त्याकाळात प्रचलित असणारे शास्त्रीय, उपशास्त्रीय संगीत आणि कानडीचाली यांच्यावर आधारित मराठी पदे खाडिलकरांनी रचल्यामुळे पदांच्या रचनेला साहित्यिक दृष्टीनेही मर्यादा येणे साहजिकच आहे.

खाडिलकर हे मुळात गद्य नाटककार होते. त्यांच्यावर संस्कृत नाटकांचा बराच प्रभाव होता, हे त्यांच्या 'मानापमान' मधील संस्कृतप्रचुर भाषेतून जाणवते. खाडिलकरांनी संस्कृत नाटकाप्रमाणे नांदी, भरतवाक्य आणि नाट्यछद्म या तंत्राचा केलेला उपयोग तसेच काही कल्पनांचेही साम्य प्रस्तुत नाटकात आढळते. खाडिलकरांच्या पदररचनेचा विचार करताना यासंदर्भात संस्कृत साहित्यातील एक उदाहरण समर्पक ठरेल. 'किरातार्जुनीय' हे संस्कृत महाकाव्य तसे समजायला साधारणपणे दुर्बोध आहे. परंतु एकदा त्यातील श्लोकांचा अर्थ कळला की, त्यातील रसमाधुरी चाखता येते. यासंदर्भात 'मल्लिनाथ' या टीकाकाराने 'नारिकेलफलसंमितं वचो भारवेः' असे म्हटले आहे. म्हणजे नारळ वरून दिसायला ओवडधोबड पण त्यातील खोबरे, पाणी हे सर्व मधुरच असते. मला वाटतं, खाडिलकरांच्या पुष्कळशा नाट्यपदांना ही उपमा तंतोतंत लागू पडेल.

**पदांचा साहित्यिक अभ्यास -**

'सं. मानापमान' नाटकात आलेली नांदी ते भरतवाक्य यामधील पदांचा विचार केला असता असे दिसते की, खाडिलकरांनी पदांमध्ये 'काव्यार्थसूचकता' हा संस्कृत नाटकातील संकेत पाळला आहे. त्यादृष्टीने 'मानापमान' मधील कथानकाचा, पदांचा, त्यातील निरनिराळ्या प्रसंगांचा समर्थपणे आस्वाद घेण्याच्या उद्देशाने पदांमध्ये दडलेला सूचितार्थ प्रकाशात येणे गरजेचे आहे. वास्तविक पाहता खाडिलकर हे पत्रकार असल्यामुळे 'बातमी देताना मथळा महत्त्वाचा' या तत्त्वाचा त्यांनी या पदरचनेतही उपयोग केलेला दिसतो. त्यामुळेच त्यांच्या पदांच्या लोकप्रियतेमागील निकष म्हणजे पदांचे आकर्षक मुखडे होत. मुखड्यांमध्येच या पदातील भावार्थ, गूढता, क्लिष्टता सोपी आणि सुलभ झाली आहे. त्यामुळे रसिकांना पदाचा संपूर्ण अर्थ जरी समजला नाही तरीही पदातील भाव, अर्थआकलनाचे किमान कार्य मुखड्यातील वेचक, वेधक साररूप शब्दांनी केलेलेच असते. त्यामुळे पुढील विस्तारचा अर्थ लावण्याकडे कोणी फारसे लक्ष देत नाही. पण या पदांचा संपूर्ण अर्थ रसिकांना समजला तर सांगीतिक आणि साहित्यिक दोन्ही दृष्टीने अधिक चांगल्या रीतीने पदे आस्वाद्य होऊ शकतात. गद्यातील शब्दापेक्षा काव्यातील शब्द अधिक सूचक, व्यंजक असतो आणि संगीताच्या माध्यमातून तो अधिक सूचक, व्यंजक बनतो. त्यामुळे गद्य भाषणातील दहा पानी संभाषणापेक्षा चार-पाच ओळींचे एखादे पद अधिक प्रभावी ठरते. त्यादृष्टीने 'मानापमान'मधील नांदी, भरतवाक्य आणि मोजक्याच पण लोकप्रिय पदांचा साहित्यिक दृष्टीने विचार करता येईल.

**पदांचे अर्थदृष्ट्या विस्तृत विश्लेषण -**

**१) नांदी - 'नमन नटवरा-'**

'नांदी' हा शब्द मराठी संगीत नाटकाच्या श्रोत्यांसमोर नुसता उच्चारला तरी तो मनोमन सुखावतो. भरताच्या नाट्यशास्त्रापासून संस्कृत नाटके आणि त्यांच्या प्रभावाने मराठी संगीत नाटकात चालत आलेली 'नांदी' म्हणजे एकप्रकारचे मंगलाचरण आहे. इष्टप्राप्ती आणि अनिष्टनिवारण हा त्याचा उद्देश असतो. "आशीर्नमस्क्रियारूप : श्लोक : काव्यार्थसूचकः ।" देवदेवतांचा आशीर्वाद मिळविण्यासाठी केलेली नमस्काररूपी प्रार्थना म्हणजे नांदी असून ती काव्यार्थसूचक असावी, असा अर्थ प्रतीत होतो. यानुसारच हमीर या भारदस्त रागातील त्रितालात निबद्ध असणारी 'संगीत मानापमान' नाटकातील 'नमन नटवरा' ही नांदी काव्यार्थसूचक किंवा नाट्यार्थसूचक आहे. जसे-'नमन नटवरा, विस्मयकारा, आत्मविरोधी कुतुहल धरा ।' या ओळींमध्ये सर्व कलांचा व शास्त्रांचा उद्गाता असलेला नटेश्वर म्हणजे शंकर याला नमन केले आहे.

या नटेश्वराला नमन केल्यानंतर त्याच्या म्हणजे नटेश्वराच्या, शंकराच्या एकूण चरित्रात परस्परविरोधी अशी जी वैशिष्ट्ये आहेत; त्यामुळे एकप्रकारचे कुतुहल, औत्सुक्य आपल्यात निर्माण होते.

'विवाह करूनी मदन जाळिला, मग मदन मित्र इंदू सेविला- ।' यात विवाह आणि मदनदाह ह्या परस्परविरोधी गोष्टी शंकरामध्ये दिसतात. तरीसुद्धा मदनाचा मित्र असलेल्या चंद्रालाही शंकराने जवळ केलेले दिसते. (म्हणूनच शंकराला 'चंद्रशेखर' म्हटले जाते.)

'धनवैरागी द्यूत खेळला, गौरीचा तो अंकित झाला ।' एकीकडे धनाविषयी वैराग्य, विरक्ती दाखवणारा शंकर हा दुसरीकडे पार्वतीबरोबर सारीपाट खेळतो, लौकिक गोष्टीत रस घेतो. परंतु शेवटी गौरीला, पार्वतीला शंकर वश झाला.

'परमेशाच्या ऐशा लीला, कविकृष्णगान विस्मयकारा' अशातऱ्हेच्या परमेश्वराच्या अगाध लीला आपल्याला दिसतात आणि कविकृष्णांनी गायलेल्या या आश्चर्यकारक गोष्टी आहेत. नांदीतील शेवटच्या पंक्तीमध्ये खाडिलकरांनी स्वतःची नाममुद्रा उमटविली आहे.[१]

शंकर आणि पार्वती यांच्याठिकाणी धैर्यधर-भामिनी या पात्रांना कल्पिले तर आपल्याला 'मानापमान' मधील कथानकाची थोडीशी सूचना मिळते. जसे शंकराप्रमाणे निर्धन वैराग्यशील परंतु लढवैय्या, वीर वृत्तीचा असणारा धैर्यधर आणि हिमालयकन्या असणाऱ्या श्रीमंत पार्वतीप्रमाणे असणारी भामिनी प्रथमतः निर्धन धैर्यधराला नाकारणारी आणि नंतर त्याला वश करण्यासाठी वनमालेच्या रूपाने धाडसी वृत्ती, सौंदर्य दर्शवून धैर्यधराला मोहित करते. आणि शेवटी त्याला वश करते. अशारीतीने संस्कृत नाटकांचा फार मोठा प्रभाव असलेल्या कृ. प्र. खाडिलकरांनी 'काव्यार्थसूचकता' हा संस्कृत नाटकांचा संकेत नांदीत पाळलेला आहे.[२] नांदीनंतर येणारे 'मोद हराचा प्रेम वाढवो' या सूचक पदात कथानकाची स्पष्ट कल्पना जरी येत असली तरी नांदीतसुद्धा कथानकाचा गर्भितार्थ दडलेला आहे, हे वरील स्पष्टीकरणावरून दिसते.

**२) 'या नवनवलनयनोत्सवा-'**

'या नवनवलनयनोत्सवा' या लोकप्रिय पदाचा अन्वयार्थ पाहिला तर तेच पद आपल्याला पुन्हा एकदा नावीन्यपूर्ण भासेल. खमाज रागावर आधारित आणि त्रितालातील हे पद धैर्यधराच्या मनातील प्रेमाच्या भावना व्यक्त करते. लालित्याकडे झुकणारा उपशास्त्रीय संगीतातील ठुमरीवजा राग खमाज या हळुवार भावना व्यक्त करण्यासाठी चपखल योजलेला आहे.

'या नवनवलनयनोत्सवा, बघुनि मानस हे अनुभवत अभिनवा, मोहन, कोमल भावा ॥ - धैर्यधराच्या मनात वनमालेला पाहिल्यावर हळुवार प्रेमाच्या कोमल अशा भावना जागृत होतात आणि नयनांना आश्चर्यकारक किंवा नवल वाटेल अशा एक प्रकारचा आनंदोत्सव पाहत आहे; असे धैर्यधराला वाटते. 'रणस्नेहाची सुंदर युवती, आता करी समाप्ती ।' यात धैर्यधर म्हणतो, माझे समरांगणाविषयीचे प्रेम ही सुंदर युवती आता नष्ट करत आहे, समाप्त करत आहे. 'वाटे अस्त्रची हे रिपुहाती, जिंकाया मम जीवा ।' यात जणू काही शत्रूनेच माझे मन किंवा मला जिंकण्याकरिता हे सुंदर अस्त्र पाठविले आहे असे धैर्यधराला वाटते.

धैर्यधर-भामिनी यांची पहिली भेट म्हणजे 'प्रथमदर्शनी प्रेमाचा प्रकार' या प्रसंगातील हे पद प्रसंग-रसपरिपोषक बनविते.

**३) 'नयने लाजवित'-**

'या नवनवलनयनोत्सवा' या पदानंतर आलेले यमनकल्याण रागातील झपतालात निबद्ध असणारे 'नयने लाजवित' हे पदही सांगीतिक आणि साहित्यिक दृष्टीने रसपरिपोषक ठरते. सांगीतिक दृष्टीने मध्यमातील यमनकल्याण असल्याने पदाच्या प्रस्तुतीकरणात कलात्मक सौंदर्य दिसते. साहित्यिक दृष्टीने पुढीलप्रमाणे सौंदर्य उलगडते. 'नयने लाजवित बहु मोल रत्ना, जणू धैर्यधर धरित धनदासम धना' दोन अनमोल रत्ने असलेले धैर्यधराचे नयन, डोळे मला लज्जित करीत आहेत असे भामिनी म्हणते. ही अनमोल दोन रत्ने म्हणजे जणू काही धनदासम- (धनद म्हणजे कुबेर याअर्थी) कुबेरासारखा अनमोल रत्नांचा खजिना धैर्यधराकडे आहे. त्यातील हे रत्नसम डोळे आहेत, असे भामिनीला वाटते. 'नमवी पहा भूमी हा चालताना-' धैर्यधराची ऐटबाज चाल ही प्रत्यक्ष भूमी म्हणजे पृथ्वीलासुद्धा नमविते असे येथे सूचित केले आहे. 'धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम् ।' ही 'उत्तररामचरिता'तील उपमा रामाच्या तोंडी लवाच्या

संदर्भात आलेली आहे. धीरोदात्त असणारी त्याची चाल पृथ्वीलासुद्धा नमविते; असे त्यात म्हटले असून ह्याच संस्कृतमधील उपमेवरून धैर्यधराविषयीची 'नमवी पहा भूमी' ही कल्पना खाडिलकरांनी मराठीत घेतलेली असावी. खाडिलकरांचा संस्कृतसाहित्याचा असणारा सखोल अभ्यास येथे दिसून येतो.

'सुचवित तीच तूची मजपुढे निर्धना'- पदातील या शेवटच्या ओळीमध्ये असे सुचविले आहे की, धैर्यधरापुढे ही ऐश्वर्यसंपन्न असणारी पृथ्वीसुद्धा निर्धन आहे. यातून असे सूचित होते की 'बहुरत्ना वसुंधरा' म्हणजे पुष्कळ रत्नांचा साठा असलेली पृथ्वी ही धनधान्यांनी संपन्न आहे परंतु धैर्यधर हा तिच्यापेक्षाही त्याच्याठिकाणी असणाऱ्या गुण, पराक्रम, रुबाबदार व्यक्तिमत्त्व अशा सत्तत्त्वशील गुणांनी संपन्न आहे. त्याच्याजवळ असणारे गुणरुपी धन हेच त्याचे ऐश्वर्य आहे. वस्तुरुपी धनापेक्षा हे गुणरुपीधन केव्हाही मोठे ठरते; ह्याची भामिनीला हळूहळू जाणीव होऊ लागते, असे ह्या पदातून सुचवायचे आहे.

**४) 'खरा तो प्रेमा नाधरी लोभ मनी-'**

बालगंधर्वांची जी नाट्यगीते अतिशय लोकप्रिय झाली त्यात खाडिलकरांच्या गीतांची संख्या इतर नाटककारांच्या नाटकातील गीतांपेक्षा अधिक आहे. अशाच लोकप्रिय पदांपैकी एक पद म्हणजे 'खरा तो प्रेमा' होय. मांड रागावर आधारित आणि 'सखी री मैका पियाबिन कुछ न सुहावे' या गझलवरून घेतलेले हे पद यापूर्वीच्या स्वगतातून निर्माण झाले आहे. ''खऱ्या प्रेमाला केव्हाही मोबदल्याची जरूरी नसते; कारण दया आणि प्रेम म्हणजेच सुखाचा झरा, त्याच्यापलीकडे आनंदाची पायरीच शिल्लक राहत नाही. मग प्रेमी जीवाला कोणचा लोभ शिल्लक राहणार आणि मोबदला तरी तो कसचा मागणार ?'' या स्वगतानंतर लगेच येणाऱ्या पदात वरील स्वगतातील आशयच आलेला आहे. स्वगतातील मनोगतातून पदाने स्फुरण पावावे; ही खास खाडिलकरी योजना आहे. 'गुणरसपान हेचि सुख, नाव तया प्रेम जनी' असे मौलिक विचार खाडिलकर त्यांच्या पदातून सांगतात. 'खरा तो प्रेमा' हे नाट्यपद आणि त्याआधीच भामिनीचे स्वगत यावर भवभूतीच्या पुढील वचनांचा प्रभाव आढळतो. ''व्यतिषजति पदार्थानान्तरः कोऽपि हेतुर्नखलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयन्ते ।'' (उत्तररामचरित अंक ६-१२)'' याचा अर्थ तुमच्या अंतरंगातील हेतू निरनिराळ्या गोष्टींना एकत्र आणतो; आणि त्यांच्यात प्रीती निर्माण करतो. कारण प्रीत किंवा प्रीती ही बाह्यगोष्टींवर अवलंबून नसते. यासंदर्भात भवभूतीने उत्तररामचरितात सूर्य आणि कमलिनी (सूर्यविकासी कमळ) यांचा दृष्टान्त घेतलेला आहे. तो पुढीलप्रमाणे- ''विकसति हि पतङ्गस्योदये पुण्डरीकं ।'' (तत्रैव ६-१२) कदाचित् खाडिलकरांनी याच दृष्टान्ताचा उपयोग करून 'खरा तो प्रेमा' या पदात 'नभीजनहितरत भास्कर तापत, विकसत पहा नलिनी ।' असे कल्पकतेने वर्णन केले असावे. याचा अर्थ आकाशात जनहितासाठी तळपणारा सूर्य पाहून नलिनी (सूर्यविकासी कमळ) प्रफुल्लित होते. हे वर्णन धैर्यधर-भामिनी यांना एकमेकांविषयी जी आंतरिक ओढ वाटते; त्यास पोषक ठरते. या पदात आलेला भास्कर हा धैर्यधराचे प्रतीक आहे; आणि नलिनी हे भामिनीचे प्रतीक आहे. म्हणजे जनहितासाठी स्वतःच्या तेजःपुंज व्यक्तिमत्त्वाने पराक्रम गाजविणारा धैर्यधर पाहून भामिनी प्रफुल्लित होते; असे स्पष्ट दिसते.

**५) 'दे हाता, शरणागता'-**

'येरानासामी' या कानडी चालीवर आणि किरवाणी रागावर आधारलेले 'दे हाता शरणागता' हे खाडिलकरांचे एक अत्यंत लोकप्रिय पण काहीसे 'फसवे' पद आहे.[३] 'दे हाता शरणागता' असे जेव्हा धैर्यधर भामिनीला सांगतो, त्यावेळी धैर्यधर हाच 'शरणागत' आहे; असा प्रेक्षकांचा आणि धैर्यधराची भूमिका करणाऱ्या नटाचाही समज झालेला असतो. खरं तर 'शरणागत' हा शब्द लक्ष्मीधराच्या दागिन्यांचे निमित्त करून धैर्यधर हा स्वतःची शरणागती व्यक्त करीत आहे; हे प्रेक्षकांच्या लक्षात येते, पण धैर्यधराकडून हे अभावितपणे घडते. कारण वनमाला हीच भामिनी आहे हे त्याला माहीत नसते. थोडक्यात, येथे Dramatic irony म्हणजेच 'नाट्यछद्म' सुंदररित्या साधलेले दिसते. वरील नाट्यार्थ सूचित करताना या पदात खाडिलकरांनी मदोन्मत्त असणारा नद उदा. ब्रह्मपुत्रा या महानदीची उपमा लक्ष्मीधराला उद्देून वापरली आहे; आणि लक्ष्मीविषयीची वैशिष्ट्ये सांगितली आहेत.

'दे हाता या शरणागता ॥ मदविलसितनदगतापंकयुता। मुखमलिनाधना हो त्राता ॥१॥- याचा अर्थ मदोन्मत्त असणारा नद जो आधीच त्याच्याठिकाणी असणाऱ्या चिखलामुळे, घाणीमुळे बरबटलेला आहे आणि त्याच्याशी संबंध आल्यामुळे ज्याचे मुख मलिन किंवा कलंकित झाले आहे अशा तुला शरण आलेल्या लक्ष्मीधराची तू रक्षणकर्ती हो, त्राता हो असे धैर्यधर भामिनीला विनंती करतो.

'संपदा चपल चरणा । आपदा भोगी नाना । परत ये पद्मसदना' यात असे वर्णन आहे की, संपत्ती ही चंचल असते त्यामुळे ती इकडेतिकडे जाते; आणि तिला खूप संकटे सोसावी लागतात. परंतु तरीसुद्धा आपले उत्पत्तीस्थान असणाऱ्या कमळापाशी ती परत येते.

'कुवलय मुख तिला; अजि कमला विनवी तुला, मला घे आता ॥२॥' कमळासारखे मुख असलेली तिचा तू स्वीकार कर. पदरी घ्या आणि पवित्र करा अशा दीन मुद्रेने ती लक्ष्मी तुझी विनवणी करत आहे; तेव्हा तिच्यावर कृपा कर. शरण आलेल्यांना असे दूर लोटू नये. असे धैर्यधर या संपूर्ण पदातून भामिनीपाशी ती लक्ष्मी स्वीकारण्याविषयी विनवणी करतो. लक्ष्मीचे उत्पत्तीस्थान असलेल्या कमळाचा संबंध भामिनीच्या मुखकमलाशी जोडणे हादेखील सूचितार्थ येथे दिसतो. अशा रीतीने नाट्यछद्माचा वापर 'मानापमान' नाटकात बहुतांशी केलेला आढळतो. याशिवाय खाडिलकरांना नाटकात जे सांगायचे असते ते, ते गद्यातून जसे सांगतात तेच पद्यातूनही सांगतात. म्हणजेच गद्यात स्पष्ट झालेला अर्थच ते पद्यात मांडतात. मला वाटतं, सर्वसामान्यांना पचण्यास, समजण्यास त्यांची पदे काहीशी कठीण असल्याकारणाने, खाडिलकरांनी त्याची पुरेपूर जाणीव ठेवलेली असावी. ज्यायोगे सर्व रसिकांना पदाची गोडी चाखता येईल.

**६) भरतवाक्य- 'गंगामदशमना पावना'**

काही मोजक्या लोकप्रिय पदांचा साहित्यिक दृष्टिकोनातून विचार केल्यानंतर नाटकाच्या प्रथेप्रमाणे नाटकाचे पूर्णत्व सिद्ध करणारा घटक म्हणजे भरतवाक्यांचा विचार करणे योग्य होईल. नांदीप्रमाणेच भरताच्या नाट्यशास्त्रापासून संस्कृत नाटकांमध्ये आणि नंतर मराठी संगीत नाटकात आलेले 'भरतवाक्य' दोन अर्थांनी बघता येते. एक म्हणजे नाट्यशास्त्रकर्ते भरतमुनी यांच्याविषयीची आदरभावना व्यक्त करण्यासाठी भरतवाक्याची योजना केलेली असते. किंवा भरत म्हणजे नट याअर्थी सर्व नटांनी एकत्र येऊन केलेली परमेश्वराची प्रार्थना म्हणजे 'भरतवाक्य' होय. 'संगीत मानापमान' नाटकातील 'भरतवाक्य' हे मालकंस राग आणि त्रितालात निबद्ध असून खाडिलकरांनी यातही काव्यार्थसूचकता पाळलेली आहे. जसे- 'गंगामदशमना, पावना, दे विमलमना बहुधनवाना'- गर्विष्ठ गंगेचा प्रवाह थोपवून धरणाऱ्या शंकराने गंगेला पावन केले, तसे धनवान् किंवा धनाढ्य लोकांना निर्मळ बुद्धी दे.

'गंगा चपल गर्वा, अखिल वाहे जलधना' जलरुपी धन धारण करणारी गंगा अत्यंत चपळ असूनही गर्विष्ठ आहे. ती अखिल जगतात वाहत असते.

'घाली महीवरी उडी खरी, पहा धरी स्वशिरी, शिकवी लीला, सकला बला, मदा स्मरारि साही ना ॥२॥' हीच गंगा पृथ्वीवर उडी घेते, तेव्हा शंकर स्वतःच्या मस्तकावर तिला धारण करतो. शंकराची ही लीला सर्वांना बोध करून देते की, शंकराला गंगेचा गर्व सहन होत नाही.

'ज्ञानासंन्निध गेली, मननसुबोधे पवित्र केली, समर्थ झाली, बहुजनमदमलविलासविपाकविनाशरणा ॥३॥ गंगा ही साक्षात् ज्ञानी असणाऱ्या शंकराजवळ गेली, मनन, चिंतनाद्वारे आणि चांगल्या विचारांद्वारे शंकराने तिला पवित्र केले. त्यामुळे गंगा ही प्रभावी ठरली, समर्थ झाली. जी सर्वसामान्य लोकांनी शरणागती पत्करल्यावर त्यांचा गर्व, ताठा नष्ट करते. थोडक्यात यातून असा नाट्यार्थ सूचित होतो की, पहिल्या अंकात 'धनी मी पति वरीन कशी अधना' म्हणून धैर्यधराला नाकारणारी गर्विष्ठ भामिनी आता अखेरच्या अंकापर्यंत धैर्यधराच्या पराक्रमावर भाळते व धनाला तुच्छ लेखते. धैर्यधराच्या सहवासात राहून नायिकेच्या विचारात आणि मनोभूमिकेत घडून येणारे मोठे परिवर्तन 'मानापमान' नाटकात नाट्यमयरीतीने रंगविले आहे. तेच शेवटी गंगा नदीच्या महतीविषयी वर्णन करताना खाडिलकरांनी म्हटले आहे की, शंकराने ज्याप्रमाणे गर्विष्ठ असणाऱ्या गंगेचे गर्वहरण केले; त्याप्रमाणेच नाटकातदेखील धैर्यधराने भामिनीचे गर्वहरण केले आहे. गंगेसारखीच

(पान क्र. ३८ वर पहा...

# गायक–नटांची परंपरा आणि मास्टर दीनानाथ मंगेशकर

- वंदना रवीन्द्र घांगुर्डे

*[नटसम्राट बालगंधर्व, संगीतसूर्य केशवराव भोसले आणि याच मालिकेतील मास्टर दीनानाथ मंगेशकर ह्यांनी मराठी रंगभूमीवर आपापल्या गानप्रतिभेने स्वतंत्र गानपरंपरा प्रस्थापित केली. 'बलवंत नाटक मंडळींची' स्थापना करून मास्टर दीनानाथांनी रसिकांना आपली 'मर्मबंधातली ठेव' बहाल केली. संगीत नाटकाच्या इतिहासातील हे सुरमय सुवर्णपान ! –संपादक]*

'संगीत शाकुंतल' रंगभूमीवर येणार ! मराठी रंगभूमीवर अद्याप जे घडले नाही ते घडणार. अशा वार्ता पुण्यात पसरल्या. 'किर्लोस्कर संगीत मंडळी' च्या नावाची हस्तपत्रके शहरात वाटली गेली. नाटकाची सगळी तिकिटे अगोदरच विकली गेली. रसिकजनही प्रयोग पहायला उत्सुक झाले होते. आणि अखेर तो दिवस उजाडला. अश्विन वद्य १३ शके १९०२ 'अमृतसिद्धि योग'. रविवार ३१ ऑक्टोबर १८८० किर्लोस्कर संगीत मंडळीच्या 'संगीत शाकुंतल'चा शुभारंभ ! बुधवारपेठेतील भाग्यामारूती समोरच्या तांवेकरांच्या वाड्यात असलेल्या 'आनंदोद्भव' नाट्यगृहाचे तिन्ही मजले गच्च भरले होते. पात्रांच्या अंतःकरणात उत्साह होता. चेहऱ्यावरचा आनंद वाढतच होता. सूत्रधार परिपार्श्वका समवेत सज्ज होऊन पडद्यात नांदी म्हणण्याकरिता उभे राहिले. 'पंचतुंड नररूंड मालधर, पार्वतीश आधि नमिती ॥ हा मंगलाचरण म्हणायला सुरवात करणार तोच पडदा ओढायला तेवढाही विलंब होऊ नये; म्हणून पडदा एकदम वर केला गेला. त्या बरोबर बलवंत पांडुरंग तथा अण्णासाहेब किर्लोस्करांनी घेतलेली सूत्रधाराची भव्यमूर्ती प्रगट होऊन त्यांचा धीर गंभीर आवाज आणि नाटेकर, शेवडे या परिपार्श्वकांचे गंधर्वतुल्य आलाप रसिकांच्या कानांना तृप्त करून गेले. सं. शाकुंतल या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाने मराठी रंगभूमीवरील संगीत नाटकाचे युग सुरू झाले. एका सोनेरी भाग्यशाली कालखंडाची सुरवात झाली.

सांगलीच्या चिंतामणराव पटवर्धन या रसिकराजाच्या प्रोत्साहनामुळे विष्णुदास भावे यांनी लिहिलेल्या 'संगीत सीता-स्वयंवर' या नाटकाने ५ नोव्हेंबर १८४३ या दिवशी मराठी संगीत रंगभूमीची मुहूर्तमेढ रोवली गेली असली, तरी खऱ्या अर्थाने गद्यपद्याचा सुरेल मेळ घालून 'एकसंध संगीत नाटक सादर झाले ते अण्णासाहेब किर्लोस्करांचे संगीत शाकुंतल !

अण्णासाहेब संस्कृत विषयाचे सखोल अभ्यासक, कवी, संगीताचे ज्ञानी, नट, दिग्दर्शक, निर्माता असल्यामुळे त्यांचे नाटक व नाट्यपदे सांगीतिक व नाट्यदृष्ट्या पूर्ण विकसित झाली. किर्लोस्करपूर्व काळात 'नाट्यपदांचे' स्वरूप अविकसित होते. पण किर्लोस्करी नाटकात पात्रांचा 'स्वमुखी भावाविष्कार' रसिकांना भावला. गायकीच्या विस्ताराची पदे अण्णासाहेबांनी ठेवली नसली तरी त्या पदांना प्रसंगानुकुल निरनिराळ्या रागात चाली दिल्या. पदांची संख्या विपुल ! संवाद, स्वगत, गीत अशी वैविध्यपूर्ण पदांची योजना केली. विविध वृत्ते, श्लोक, आर्या, कामदा, कटाव साकी, दिंडी, ओवी, अंजनीगीत, माझघरातील गाणी अशा विविध पदरचना केल्या. ज्या दोन कलाकारांमुळे शाकुंतलचे यश आणि संगीत कळसाला पोहोचले ते म्हणजे बाळकोबा नाटेकर आणि मोरोबा वाघोलीकर. शकुंतलेची भूमिका करणारे शंकरराव मुजुमदार अत्यंत देखणे होते. पण ते गायक नव्हते. काही काळानंतर भाऊराव कोल्हटकर किर्लोस्कर नाटक मंडळीत आले. स्त्रीनं सुद्धा त्यांच्या रूपाचा हेवा करावा; इतके भाऊराव देखणे होते. गोड गळ्याची दैवी देणगी होती. आता शाकुंतलात 'शकुंतला गाऊ लागली. शकुंतलेची गाणी अण्णासाहेबांचे लाडके शिष्य गोविंद बल्लाळ देवल यांनी लिहिली. शाकुंतलनंतर किर्लोस्करांचे दुसरे संगीत नाटक रंगमंचावर आले, ते म्हणजे 'संगीत सौभद्र'. हे नाटक सर्वांगाने श्रेष्ठ ठरले. या नाटकाने लोकप्रियतेचे शिखर गाठले. दुर्दैवाने अण्णासाहेबांचे 'रामराज्यवियोग' हे नाटक अर्धवटच राहिले. त्यांना अवघ्या ४२व्या वर्षी मृत्यू आला. क्षणभर वाटले ही नाटकाची रामवीणा बंद

पडणार काय ? पण अण्णांचे शिष्य गोविंद बल्लाळ देवल यांनी ही वीणा समर्थपणे आपल्या अंगावर पेलली. इतकेच नव्हे; तर संगीत नाटकाचे वस्तुपाठच त्यांनी दिले. देवलांच्या अत्यंत सोप्या, सरळ, साध्या लेखनाने आणि सहजसुंदर लालित्यपूर्ण भाषेतील नाट्यपदांनी मृच्छकटिक, शारदा, संशयकल्लोळ ही त्यांची नाटके अत्यंत लोकप्रिय झाली. या नाटकांमुळे 'किर्लोस्करी संगीत नाटक' आकाराला आले.

किर्लोस्कर-देवलांच्या नंतर श्रीपादकृष्ण कोल्हटकर यांची संगीत-नाटके आली. त्यांची नाटके मात्र वेगळ्या बाजाची होती. त्यांच्या नाटकात पारशी उडत्या चालीची, खटका, मुरक्यांची नाट्यपदे आली. श्रीपाद कृष्ण व्युत्पन्न पंडित होते. त्यांच्या नाटकात काल्पनिक कथानक, पाश्चात्य नाटकांच्या धर्तीवर कथेची गुंफण, कोट्यांनी युक्त असे चटकदार संवाद, विनोद, काव्यात्मकता यांचा अंतर्भाव होता. स्वतः कवि, जाणकार संगीततज्ज्ञ असल्यामुळे आधी चाल बांधून त्यावर नंतर ते शब्दरचना करीत असत. श्रीपाद कृष्ण हे राम गणेश गडकऱ्यांचे गुरू! गडकरी त्यांच्या लेखनाबद्दल म्हणत- ''तात्या, ती तलवार तुमची ! बाकी विळे, कोयते !'' कोल्हटकरांचे नाटक पाच अक्षरी नावांचे- वीरतनय, मूकनायक, गुप्तमंजूष, मतिविकार, प्रेमशोधन. या नाटकांनी आपला वेगळा बाज प्रस्थापित केला.

कोल्हटकरांच्या नंतर कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर राम गणेश गडकरी याही प्रतिभावान लेखकांच्या नाटकांनी आपला स्वतंत्र ठसा उमटविला.

खाडिलकरी नाटकापासून संगीत नाटकात संगीत गायन वाढले. प्रतिभासंपन्न गडकऱ्यांच्या नाटकांनी वाङ्मयीनमूल्य, नाट्यमूल्य उत्तम जपले; तरी त्यांच्या नाटकातील पदे खाडिलकरी-नाट्यपरंपरेनुसार शास्त्रीय रागदारी व उपशास्त्रीय गीत प्रकारात गायकी अंगाने गायली जाणारी पदे म्हणून गाजली. किर्लोस्कर, देवल, श्रीपाद कृष्ण कोल्हाटकर, खाडिलकर, गडकरी अशा लेखकांच्या संगीत-नाटकाच्या परंपरा, आपल्या स्वतंत्र बाजाच्या नाटकांनी, लोकांना संगीत रंगभूमीकडे आकर्षित करीत होत्या. संगीत रंगभूमी बहरत होती. याचबरोबर गायक-नटांची एक तेजस्वी प्रभावळ निर्माण होत होती. बाळकोबा नाटेकर, मोरोबा वाघोलीकर, भाऊराव कोल्हटकर, कृष्णकांत गोरे, शंकरराव सरनाईक, गोविंदराव टेंबे, मा. कृष्णराव फुलंब्रीकर, सवाई गंधर्व, नारायणराव जोगळेकर, गंगाधरपंत लोंढे, बापूराव पेंढारकर हे गायक नट म्हणून गाजत होते. तरी आपल्या स्वतंत्र गायकीचा ठसा उमटवून नारायणराव राजहंस ऊर्फ नटसम्राट बालगंधर्व, संगीतसूर्य केशवराव भोसले आणि मास्टर दीनानाथ मंगेशकर या तिघांनी आपली स्वतंत्र गायन परंपरा रंगभूमीवर प्रस्थापित केली.

'हा अलौकिक मुलगा प्रथमच माझ्या कंपनीत आला असता, तर मी त्याला मंगेशीपासून मुंबईपर्यंत रुपयांच्या पायघड्या घालून माझ्याकडे आणले असते.' नटसम्राट बालगंधर्वांनी हे उद्गार ज्या १३ वर्षांच्या मुलाबद्दल काढले; तो मुलगा म्हणजे श्रेष्ठ गायक अभिनेते मास्टर दीनानाथ गणेश मंगेशकर !

मास्टर दीनानाथ गोव्याचे, गोव्यातील 'मंगेशी' या देवस्थानचे म्हणूनच मंगेशकर ! पिता गणेशभट भिकाजी अभिषेकी (नवाथे) आणि माता येसुबाई यांच्या पोटी दि. २९ डिसेंबर १९०० या दिवशी श्रीक्षेत्र मंगेशी येथे मा. दीनानाथांचा जन्म झाला.

गौर अंगकांती, मोहकमुद्रा, कुणाचेही लक्ष वेधून घेई असे हरिणासारखे चंचल नेत्र, विशाल भाल प्रदेश, कुरळे केस, उंच सडपातळ नाजूक बांधा आणि या सौंदर्याला साजेसा गोड आवाज. धीट, हजरजबाबी, बुद्धीने तल्लख असा अत्यंत देखणा 'बालदीना' सर्वांना हवाहवासा वाटायचा. दीनानाथ बुद्धिवान, ईर्षावान् तसेच खोडकर, प्रेमळ होते. गाण्याची आवड व चमत्कार वाटावा असा असाधारण गळा उपजतच होता, निसर्गाने त्यांना प्रथमपासूनच विलक्षण गतिमान 'फिरत' बहाल केलेली होती. स्वरांची स्थाने जन्मतःच पक्की आणि म्हणण्यात एक स्वाभाविक फेक !

निसर्गाचे अद्भुत वरदान लाभलेल्या मंगेशीत बाल दीनानाथांचा देवदत्तस्वर बहरू लागला. मंदिरातील वेदमंत्रांनी वाणीवर संस्कार झाले. तर पांडोमाम् मंगेशकरांकडून सारंगीचे प्राथमिक शिक्षण मिळाले. शालेय शिक्षणापेक्षा कलेकडे असलेली ओढ पाहून आईने त्यांना रघुनाथ उर्फ बाबा माशेलकर यांच्याकडे गायन शिकण्यासाठी पाठवले. श्री. माशेलकर हे पं. भास्करबुवा बखले यांचे गुरूबंधू. उत्कृष्ट तबलावादक व गायक होते.

अल्पावधीतच बालगायक दीनानाथांची कीर्ती दूरवर पसरली. भरतीच्या लाटांसंगे खेळावं, ताडामाडासंगे नाचावं, 'कोकीळ मैने संगे गावे' आणि रात्री कुठे नृत्यगायन असेल तर तिथे तहान भूक विसरून तल्लीन व्हावे. हा बाल दीनानाथांचा दिनक्रम होता.

असामान्य आवाजीच्या गाण्याने बालदीनाचा हां हां म्हणता बोलबाला झाला. मैफिलीकरिता त्यांना पंचक्रोशीतून इकडून तिकडून बोलावणी येऊ लागली. रागदारी शास्त्रीय संगीताबरोबरच ते किर्लोस्कर-देवलांच्या नाटकातील पदे गात असत. कुणीकुणी त्यांना म्हणत असे- 'अरे दिना, तू नारायणराव बालगंधर्वांची पदे म्हणत जा. तू ती खूप छान म्हणतोस. त्यामुळे तुझे जास्त नाव होईल. तेव्हा अवघ्या सात वर्षांचे बालदीनानाथ त्यांना म्हणाले, ''मला प्रसिद्धी मिळेल ती गंधर्वांची पदे चांगली गातो म्हणून. पण मला तसं नकोय!'' मला कुणाचीही नक्कल करायची नाही. मला माझं स्वतःचं गाणं गायचं आहे.''

महाराष्ट्रात अभिजात संगीत नाटकांची वैभवशाली परंपरा निर्माण करणाऱ्या किर्लोस्कर संगीत मंडळींतून बालगंधर्व, गोविंदराव टेंबे, गणपतराव वोडस हे बाहेर पडले; आणि १९१३ साली त्यांनी 'गंधर्व संगीत मंडळी' स्थापन केली. त्याच वेळी मा. दीनानाथांची कीर्ती ऐकून 'ताबडतोब किर्लोस्करच्या चालकांनी त्यांना आपल्या कंपनीत आग्रहपूर्वक घेतले. त्यावेळी दीनानाथांचे वय १३ वर्षांचे होते. याचवेळी नटसम्राट बालगंधर्वांनी दीनानाथांविषयी काढलेल्या उद्गारातून, दीनानाथांची बालवयातील गाण्याची तयारी दिसून येते.

दीनानाथांचे किर्लोस्कर मंडळीच्या रंगमंचावर पहिले पदार्पण झाले ते १९१५ साली हैद्राबाद मुक्कामी झालेल्या उर्दू 'ताज़-ए-वफा' या नाटकातील 'कमलेच्या' भूमिकेत. या नाटकातील 'बालम सुरतिया' व 'हाय रे जमाना तोरी चाल' ही पदे गजल-कव्वाली ढंगात दीनानाथ नृत्याची अदा करून अस्सल रागदारी ढंगात पेश करत असत. या गाण्यांना त्यांना दहा-पंधरा वन्समोअर पडत. या नाटकावर किर्लोस्कर मंडळीने दिल्लीपासून कलकत्त्यापर्यंत सारा उत्तरप्रांत पादाक्रांत केला. तडफदार नखरेल गाणे आणि जोडीला चित्तवेधक नटखट अभिनय यामुळे प्रेक्षक श्रोत्यांवर दीनानाथांची जबरदस्त मोहिनी पडली. प्यारा साहेबांसारखे अव्वलदर्जाचे समजले जाणारे कलकत्त्यातील गवई मान तुटेपर्यंत माना डोलवू लागले. हिंदी-उर्दू मिश्रित नाटके करत किर्लोस्कर मंडळी निजामी मुलूख गाजवत होती. त्यामुळे साहजिकच काही काळ महाराष्ट्राच्या रंगभूमीचे दर्शन दुर्लभ झाले. १९१६ साली महाराष्ट्रात परत आल्यावर मंडळींनी 'संदेश'कार अच्युत बलवंत कोल्हटकर यांचे 'सुंदोपसुंद' नाटक केले. यात 'सुविभ्रमे'च्या भूमिकेतील 'रमणी मुद्रित ठाकली' हे दीनानाथांच्या तोंडचे पद अफाट गाजले. 'संदेश'कारांनी दीनानाथांना 'मास्टर' ही पदवी दिली; आणि तेव्हापासून अवघ्या महाराष्ट्रात दीनानाथ मंगेशकर हे मास्टर दीनानाथ मंगेशकर म्हणून ख्यातनाम झाले.

मानापमान, सौभद्र, शारदा, विद्याहरण इ. नाटकातील खानदानी रागदारी संगीताबरोबरच हिंदी उर्दू नाटकातील नाचाची गज़ल-कव्वाली ठुमरीची गोडी दीनानाथांना लागली. याच काळात दीनानाथांनी गडकरी मास्तरांचा सहवास मिळाला. ताज-ए-वफा मधील 'कमले'ची भूमिका पाहूनच दीनानाथांना गडकरी मास्तरानी 'पुण्यप्रभाव' या नाटकात किंकिणीची भूमिका दिली. किर्लोस्कर मंडळीचे 'पुण्यप्रभाव' नाटक इतके गाजले कीं या नाटकाने उत्पन्नाचा उच्चांक गाठून किर्लोस्कर मंडळीला कर्जमुक्त केले. विशेषतः दीनानाथांच्या किंकिणीच्या कामामुळे- गाण्यामुळे पुण्यप्रभाव नाटकाच्या अर्ध्या यशाचे ते वाटेकरी झाले. यावेळी बालगंधर्वांनी दीनानाथांची ओतःप्रोत स्तुती केली. ते म्हणाले, 'मी आणि केशवराव रंगभूमीवर पाय रोवून उभे असताना आमच्याहून बारा तेरा वर्ष वयाने लहान असलेला दीनानाथ आमच्या मागाहून रंगभूमीवर आला आणि स्वतःचे स्वतंत्र गाणे गायला. लोकप्रिय झाला. दोन्ही नाट्यगृहातील अंतरमाप पाच-पाच रुपयांच्या नोटा अंथरून त्याला चालत आणावा इतकी त्याची योग्यता आहे ! या शब्दात गंधर्वांनी दीनानाथांची प्रशंसा केली तर केशवराव भोसले दीनानाथांचं गाणं ऐकण्यासाठी प्रत्यक्ष किर्लोस्कर मंडळीच्या बिऱ्हाडी स्वतः आले.

१९१८ साली वयाच्या अठराव्या वर्षी मा. दीनानाथांनी चिंतामणराव कोल्हटकर आणि कृष्णराव कोल्हापुरे या सहकाऱ्यांच्या साथीने 'बलवंत संगीत मंडळी' स्थापन केली. राष्ट्रभक्त दीनानाथांच्या या

'बलवंत' नावामध्ये लोकमान्य टिळक व बलवंत पांडुरंग उर्फ अण्णासाहेब किर्लोस्कर यांची प्रेरणा सूचित होते. 'बलवंतच्या' १९१८ ते १९४० या २२ वर्षांच्या काळात दीनानाथांचे कलाकर्तृत्व झळाळून उठले.

'बलवंत' ही एक ध्येयवादी, नाविन्याची आवड असलेली साहित्यप्रेमी नाट्यसंस्था होती. बहुविध गुणांनी युक्त अशी लहान मोठी व्यक्तित्वे तिच्यात एकत्र आली होती. निव्वळ मनोरंजन आणि उदरनिर्वाहाचे साधन अशी तिची जडणघडण होती. तिचे वातावरण देखील विशूद्ध व अभिमान वाटावा असे होते. रामगणेश गडकरी, वासुदेव शास्त्री खरे, वीर वामनराव जोशी, स्वातंत्रवीर विनायक दामोदर सावरकर, विश्राम बेडेकर असे प्रतिभाशाली नाटककार बलवंतला मिळाले. 'बलवंत'साठी किंवा बलवंत मधील कोल्हटकर, दीनानाथ, कोल्हापुरे, दिनकर (कामण्णा) ढेरे अशा वैशिष्ट्य संपन्न मंडळींना डोळ्यासमोर ठेवून नाटके लिहिली गेली. विविध क्षेत्रातील तेजस्वी पैलू असलेली अनेक मंडळी 'बलवंत'मधे येत जात असत. भाषा, प्रांत यांच्या मर्यादा ओलांडून बलवंतने अमराठी हिंदी-उर्दू नाटके रंगभूमीवर आणली आणि अमराठी रसिकांसमोर 'संगीत नाटक' लोकप्रिय केले. हिंदी, उर्दू, पारशी, गुजराथी, मूलतानी सर्व रसिकांचे लोंढे बलवंतच्या नाटकाला अर्थात दीनानाथांचे गाणे ऐकायला गर्दी करत असत.

बलवंतच्या 'भावबंधन' नाटकाच्या वाढत्या लोकप्रियतेमुळे पहिल्या ओळीच्या खुर्चीचा तिकिटाचा दर तीन रुपयांचा पाच रुपये करावा लागला. तर 'राजसंन्यास'च्या प्रचंड यशामुळे मुंबईला शनिवारच्या 'दुपारच्या' प्रयोगाची प्रथा व दर रविवारी सकाळच्या प्रयोगाची व मॅटिनीच्या प्रयोगाची प्रथा पडली. पारंपारिक नाटकांबरोबरच बलवंतची 'भावबंधन', 'उग्रमंगल', 'राजसंन्यास', 'रणदुंदुभि', 'संन्यस्त खड्ग', 'ब्रह्मकुमारी' ही नाटके अजरामर झाली. बलवंतचे 'मानापमान' हा तर बलवंतच्या यशाचा एक डौलदार मानाचा तुरा असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

'बलवंत' मधील मा. दीनानाथांच्या भूमिकांबद्दल चिंतामणराव कोल्हटकर लिहितात- 'गडकऱ्यांच्या 'भावबंधन' मधील 'लतिका' म्हणजे त्यांच्या लौकिक आयुष्याचा उषःकाल होता. खरे शास्त्र्यांच्या 'उग्रमंगल'मधील 'पद्मावती' म्हणजे प्रातःकाल व वीर वामनरावांच्या 'रणदुंदुभी' नाटकातील 'तेजस्विनी' मध्यान्हाच्या तळमणाऱ्या सूर्याप्रमाणे प्रकर्षाने डोळे दिपविणारी होती. प्रकर्षावस्थेतील स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या 'संन्यस्त-खड्गातील सुलोचना, मानापमानातील 'धैर्यधर' विश्राम बेडेकरांच्या 'ब्रह्मकुमारी तील 'गौतम' या त्यांच्या आणखी महत्त्वाच्या भूमिका सांगाव्या लागतील. 'लतिका' हा निसर्ग होता, 'पद्मावती' हा अभ्यास होता व 'तेजस्विनी' ही साधना होती.

मा. दीनानाथांची कारकीर्द प्रामुख्याने मराठी रंगभूमीवर घडली असली तरी त्यांचा शास्त्रीय संगीताचा व्यासंग मोठा होता. पं. रामकृष्णबुवा वझे यांचे त्यांनी विधिवत् शिष्यत्व पत्करले; तरी एकपाठी विलक्षण बुद्धिमान दीनानाथ अनेक ज्येष्ठ गवयांना ऐकून आपली गायकी समृद्ध करत होते. यामध्ये बीनकार मुरादखाँ, त्यांचा मुलगा निसार हुसेन, भास्करबुवा बखले, गणपतीवुवा भिलवडीकर, इस्माईलखाँ अब्दुलखाँ, रहिमतखाँ, हफीजखाँ, सुखदेव प्रसाद कथकस कद्रतुल्ला, छब्बूखाँ, अल्लादियाखाँ, अब्दुलकरीम खाँ, गुलाम रसूल, हदुखाँची शिष्या 'कालीमंगू' असे गायक होते. तत्कालीन गायक नटात शास्त्रीय संगीताचा भक्कम आधार असलेलं मा. कृष्णराव, सवाई गंधर्व, विनायकबुवा पटवर्धन, असे थोडेच कलाकार होते. त्यातही दीनानाथांचे गाणे शास्त्रीय आधाराचे ! तरीही; उत्स्फूर्त प्रतिभेचे असे. आकाशवाणीवरून मलुहा केदार, हेमकल्याण, बागेश्री बहार, बागेश्री कानडा, श्रीगौरी असे अनवट राग त्यांनी अधिकाराने गायले. आकाशवाणीवरील पहिल्याच कार्यक्रमात त्यांचा 'मलुहा केदार' ऐकून बुखारी साहेबांसारख्या दर्दी अधिकाऱ्याने त्यांना मिठी मारली. रंगभूमीवरील व्यस्त कारकीर्द आणि ४१ वर्षांचे अल्प आयुष्य लाभूनही त्यांनी शास्त्रीय संगीतावर कमालीचा अधिकार मिळवला होता. या त्यांच्या व्यासंगामुळे 'संन्यस्तखड्ग', 'ब्रह्मकुमारी', 'उग्रमंगल' अशा नाटकांना ते उत्कृष्ट संगीत देऊ शकले. 'संगीतकार' म्हणूनही दीनानाथांनी रंगभूमीवर मोलाचे योगदान केले आहे. 'मानापमान' नाटकातील धैर्यधरांच्या पदांच्या चाली त्यांनी बदलल्या. 'शूरा मी वंदिले', 'प्रेमसेवा शरण', 'चंद्रिका ही जणू' या चाली विलक्षण लोकप्रिय झाल्या.

मराठी संगीत रंगभूमीवर 'नाट्यसंगीताचा' घाट



अनुक्रमणिका

सुस्थापित होऊन नाट्यसंगीताचा सुवर्णकाळ असताना मा. दीनानाथांनी स्वतःची तेजस्वी तरीही मधुर गायनशैली प्रस्थापित केली. नाट्यसंगीतातील एक नवीन 'पर्व' सुरू केले.

मा. दीनानाथांनी बहारदार 'पंजाब' बाज प्रथमतः नाट्यसंगीतात आणला. 'उग्रमंगल' नाटकात प्रथमतः कथ्थक नृत्य आणले. उत्तमोत्तम शास्त्रीय बंदिशी, गजला रंगभूमीवर आणल्या.

मा. दीनानाथांचे गाणे आक्रमक असे. त्यांची वायुतत्त्वावर आधारलेली 'भिंगरीची तान' श्वास रोखून धरायला लावणारी होती. लागोपाठचे 'स्वर' आणि 'श्रुती' एका मागोमाग वेगाने घेऊन ती चमत्कृती साधते. त्यांचे स्वरतालावर प्रचंड प्रभुत्व असले तरी भावनेने ओथंबलेले गायन ऐकल्यावर काहीतरी अपार्थिव आणि दिव्यत्वाचा स्पर्श असलेले संगीत ऐकल्याची जाणीव होई. उदंड दम-श्वास, आक्रमक तान, निसर्गदत्त दैवी आवाज, अनुनासिकाचा कलात्मक वापर, विस्तृत्व, स्वर सप्तकीय रेंज, तीन सप्तकातील सहज फिरतं, अस्खलित वाणी, अनपेक्षित स्वरसंगतीने साधलेला कलात्मक अपेक्षाभंग, उत्तुंग प्रतिभा विलास' दुर्दम्य ईर्षा अशा विविध गुणांनी नटलेले दीनानाथांचे गाणे अपूर्व होते.

१९३३ मधे संगीत रंगभूमीच्या पडत्या काळात नवीन बोलपटांच्या आकर्षणामुळे 'बलवंत'ने चित्रपट क्षेत्रात पदार्पण केले. 'कृष्णार्जुन युद्ध' हा पहिला चित्रपट. त्यातील 'सुहास्य तुझे, मनास मोही' हे गाणे गाजले. पण चित्रपट चालला नाही. त्यानंतरचे सर्व चित्रपट अयशस्वी झाल्यामुळे दीनानाथ आलेल्या नैराश्यातून ते सावरू शकले नाहीत. मा. दीनानाथांचे व्यक्तित्व एक अजातशत्रू, सहृदय व्यक्ती असे होते. आबासाहेब मुजुमदार यांनी सिमला येथे तत्कालीन ब्रिटीश गर्व्हनर समोर मा. दीनानाथांचा जलसा केला. त्यात 'परवशता पाश दैवे ज्यांच्या गळा लागला' हे पद निर्भयपणे गायले. याच देशभक्तीमुळे स्वा. सावरकरांकडून 'संगीत संन्यस्तखड्ग' हे नाटक लिहून घेऊन त्यांनी सादर केले.

वयाच्या ४१व्या वर्षी २४ एप्रिल १९४२ रोजी पुणे मुक्कामी दीनानाथ अकाली नादब्रह्मात विलीन झाले तरी त्यांचे स्वर त्यांच्या ध्वनीमुद्रिकांतून अमर झाले आहेतच. पण त्यांच्याच अनेक बंदिशींवर आधारित अनेक गीते ही त्यांचे सुपुत्र पं. हृदयनाथ मंगेशकर यांनी संगीत जगताला दिली. भारतरत्न लता मंगेशकर, आशा भोसले, मीना खडीकर, उषा मंगेशकर या त्यांच्या कन्यांनी दीनानाथी स्वरांचा वेलू गगनावरी नेला. संपूर्ण शतकाहून अधिक काळ दीनानाथी स्वरांनी संगीत जगताला मोहविले यात शंका नाही.

❖❖❖

**सौ. वंदना रवींद्र घांगुर्डे**
'नादब्रह्म' ५१ देवघर सोसायटी, चिंचवड, पुणे ३३.
फोन : २७४५४४७९, ९८२२०९८५१३

## भावपूर्ण श्रद्धांजली !

१) महाराष्ट्र साहित्य परिषदेचे माजी अध्यक्ष, साधना ट्रस्टचे विश्वस्त, इंग्रजीचे प्राध्यापक, समाजवादी, विधान परिषदेचे सदस्य, प्रज्ञावान साहित्यिक, त्यागशीलसेवाभावी व्यक्तिमत्त्व प्रा. ग. प्र. प्रधान सरांचे निधन ! (दि. २९ मे २०१०)

२) पं. अरविंद गजेंद्रगडकर प्रसिद्ध बासरीवादक, स्वरमंडलवादक आणि संगीततज्ज्ञ, संगीतसमीक्षक, भाषाविज्ञानाचे अभ्यासक यांचे निधन. (दि. १ जून २०१०)

३) चित्रपट महामंडळाचे अध्यक्ष व चित्रपटनिर्माते अजय सरपोतदार यांचे निधन. (दि. १ जून २०१०)

४) मनोहर मासिकाचे संपादक, विनोदी साहित्यिक, श्री. भा. महाबळ यांचे निधन. (दि. २ जून २०१०)

५) श्रीमती अरुणा दामले- 'प्रभात'चे एक संस्थापक श्री. विष्णुपंत दामलेंच्या स्नुषा, यांनी प्रभातच्या चित्रपटांच्या चित्रफितींच्या लायब्ररीचे जतन मोठ्या प्रयत्नाने केले. (निधन - २ जून २०१०)

६) साहित्यिक श्रीमती निर्मला मोने यांचे निधन. (दि. ७ जून २०१०)

(महाराष्ट्र साहित्य परिषदेची कार्यकारिणी)



अनुक्रमणिका

# नाट्यवेद

डॉ. सौ. श्रद्धा सं. सोमण

*[ पाठ्य, गान अभिनय आणि रस मिळून पाचवा नाट्यवेद होय. 'ज्ञानो नाट्यमय साक्षात् रूप' प्रेक्षकांशी संवाद साधणारे असले की संज्ञापनाचे वर्तुळ पूर्ण होते. ज्ञानाचा अमृतानुभव देण्यासाठीच नाट्याविष्काराचा महाप्रवास चालला आहे.*
*–संपादक ]*

नाटक एक लोकप्रिय साहित्यप्रकार. ग्रीक आणि संस्कृत नाट्यवाङ्मयाला तर शतकांचा इतिहास आहे. संस्कृत नाट्यपरंपरा भरतमुनींपासून सुरू झाली. नाटक ही एक दृक्‌श्राव्य कला आहे. हेच त्याचे इतर वाङ्मय प्रकारांपेक्षा असलेले वेगळेपण आहे. नाटक हे प्रयोगाकरिता असते. त्याचमुळे नाटकावर स्थळकाळाच्या मर्यादा येतात, बंधनें येतात. कथा, कादंबरी प्रमाणे नाटकात वेगळा निवेदक येत नाही. पात्र एकमेकांशी बोलत असतात, संवाद करीत असतात. कथानक उलगडत जाण्याचा तो एक मार्ग असतो. नाटकातील कथा कृतिशील संवादांच्या माध्यमातून साकारत जाते. प्राचीन काळापासून 'काव्येषु नाटकं रम्यम् !' असा नाटकाचा अंतर्भाव काव्यातच केला आहे. साहित्यकृती म्हणून नाटक जसे वाचनीय असते, त्याचप्रमाणे रंगमंचावर अभिनयाच्या माध्यमातून होणारे प्रकटीकरण प्रेक्षणीय असते.

नाटक या वाङ्मयप्रकाराच्या प्राचीन काळापासून विविध व्याख्या करण्यात आल्या आहेत. भरतमुनी आपल्या 'नाट्यशास्त्र' या ग्रंथात नाटकाची व्याख्या करताना म्हणतात,

'योऽयं स्वभावो लोकस्य सुखःदुःख समन्वित
सोऽङ्‌ गद्याभिनयोगेतः नाट्यामित्याभिधीपयते''
(नाट्यशास्त्र १/११९)

(अर्थ : सुख दुःखान्वित असा जो लोकस्वभाव तो आंगिक अभिनयाने रसिकापर्यंत पोहोचला; म्हणजे त्याला नाट्य म्हणतात.)[१]

भरतमुनींच्या व्याख्येत- लोकस्वभाव म्हणजेच लौकिकात घडलेल्या घटना किंवा व्यवहार होत. प्रत्यक्षात, वास्तवात, घडलेली घटना जशीच्या तशी कवी साहित्यात आणीत नाही; तर त्यामध्ये तो आपल्या प्रतिभेची भर घालतो व त्यातून नवनिर्मिती व सौंदर्यनिर्मिती करतो.

अभिनवगुप्त आपल्या नाट्यविषयक विवेचनात सांगतो, 'नाट्य म्हणजे नटाच्या अभिनयातून प्रकट होणारा व प्रेक्षकांकडून निश्चल मनाने अखंड स्वरूपात ग्रहण केला जाणारा, संपूर्ण प्रयोगातून द्योतित होणारा असा एकात्म अर्थ होय.'[२]

साहित्यशास्त्र मीमांसकांप्रमाणेच नाटकाचा आस्वाद घेणारे प्रेक्षक, समीक्षक आणि नाटककार यांनीही नाटकाविषयी विविध मते नोंदवली आहेत.

नाटककार वसंत कानेटकर यांच्या मते, 'नाटक म्हणजे एक प्रकारचा भातुकलीचाच खेळ आहे; पण चतुर कलाकारांनी कल्पकतेने मांडलेला एक जिवंत चैतन्यशील खेळ आहे. खेळात तेवढ्याच चातुर्याने सहभागी होणाऱ्या कल्पक प्रेक्षकांसाठीही.'[३]

ज्येष्ठ समीक्षक प्रा. गंगाधर पाटील यांच्या मते, 'नाटक ही अनेक चिन्हांनी बनलेली एक बहुजिनसी कला आहे. तसेच ती एक प्रयोगक्षम कला आहे. नाटक, नट, रंगमंच, प्रकाशयोजना, संगीत, प्रेक्षक इ. मिळून नाटकाचा प्रयोग साकार होत असतो.'[४]

या सर्व व्याख्यांमधून नाट्यप्रयोगाचा विचार केला गेला. नाटकामध्ये 'नाट्य' हे प्राणभूत तत्त्व. नाट्य म्हणजे द्वंद्व किंवा संघर्ष होय. नाट्याचा विचार आपल्या नाट्यशास्त्रामध्ये करताना भरतमुनींने याला नाट्यवेद म्हटले. या नाट्यवेदाची निर्मिती चार वेदांपासून झाली असून पाठ्य, गान, अभिनय आणि रस ही नाट्याची चार अंगे सांगितली आहेत.

नाटक ही एक संमिश्र, संयुक्त कला आहे असे म्हटले जाते. चित्रकला, वास्तुकला, नृत्य, संगीत इत्यादी कलांच्या सहाय्याने नाटक आकाराला येत असते. नेपथ्य, प्रकाशयोजना, संगीत, रंगभूषा, वेशभूषा इत्यादी घटकांमधून नाटकाचे संमिश्र रूप सिद्ध होत असते.



अनुक्रमणिका

थोडक्यात, नाटक म्हणजे एक संयोगी प्रकटन असते. ऋग्वेदापासून पाठ्य, सामवेदापासून गायन, यजुर्वेदापासून विधीपूर्वकता आणि अथर्वापासून रस अशा चार वेदांच्या संयोगातून नाट्याची निर्मिती होत असते. तोच पाचवा वेद-नाट्यवेद !

नाटक हे प्रयोगशील असल्याने त्याचा वेगवेगळ्या अंगाने विचार केला जाऊ शकतो. पण सर्वात महत्त्वाचे म्हणजे अंग नाट्य किंवा संघर्ष आवश्यक असतो आणि संघर्षाशिवाय कृती होत नाही. या संघर्षाचा विचार करताना नाट्यबीज, कथानक, पात्र, प्रसंग, संवाद, भाषा इत्यादी भाषिक घटकांचा विचार करावा लागतो. तसेच नेपथ्य, रंगभूषा, प्रकाशयोजना, अभिनय, संगीत इत्यादी अभाषिक घटकांचाही विचार करावा लागतो.

या सर्व मिळून बनलेल्या नाट्यसंहितेविषयी प्रा. गंगाधर पाटील म्हणतात, ''नाट्यसंहिता भाषिक चिन्हांनी बनलेली असते. नाट्यप्रयोगात शब्दांना अवकाशाचे, छाया प्रकाशाचे, अभिनयाचे, स्वरांचे परिमाण लाभते. त्यामुळे शब्दचिन्हांचे रंङ्गचिन्हात रूपांतर होते. अशा प्रकारे नाट्यसंहिता व रंङ्गसंहिता या दोन्हीचे अस्तित्व मान्य करावे लागते.''[५] काही संहितांमध्ये शब्दावर म्हणजे भाषिक चिन्हावर भर दिलेला असतो; तर काही संहितांमध्ये अभाषिक चिन्हांवर भर दिलेला असतो. या दृष्टीने नाट्यसंहितेचे दोन प्रकार मानता येतात. शब्दप्रधान संहिता आणि दुसरी शब्दविरहित संहिता. म्हणजेच एक भाषिक चिन्हांची व दुसरी रंगमंचीय सूचनांनी निर्देशित केलेली अभाषिक चिन्हांची.

नाट्यसंहिता प्रेक्षकांसमोर साकार होत असते ती नाट्याच्या-अभिनयाच्या-माध्यमातून. या प्रयोगाच्या सादरीकरणात एकूण तेरा (१३) चिन्हसारणी गुंतल्याचा उल्लेख प्रा. गंगाधर पाटील करतात- १. शब्द, २. शब्द संहितेचे उच्चारण, ३. चेहऱ्यावरील हावभाव, ४.अभिनय, ५. नटाचे रंगमंचावरील चलनवलन, ६.नटाचा शरीरबांधा, ७. केशरचना, ८. वेशभूषा, ९.रंगमंच सामग्री, १०. नाटकाचे नेपथ्य, ११. प्रकाश योजना, १२. संगीत, १३. ध्वनी परिणाम.

नाट्यसंहितेचा विचार करताना नाट्यबीज, कथानक, पात्र, संवाद आणि भाषा या घटकांचा विचार करावा लागतो.

**नाट्यबीज** - नाटककार हा समाजाचाच एक घटक असतो. ज्या समाजात तो रहात असतो, वावरत असतो, त्या समाजात घडणाऱ्या वैशिष्ट्यपूर्ण घटनांचे सूक्ष्म निरीक्षण करत असतो. नेहमीच्या घटना, प्रसंगापेक्षा आगळेवेगळे काही लक्षात आले तर ते नेमकेपणाने तो टिपून ठेवतो. एखादी घटना, एखादी व्यक्ती त्याच्या मनावर प्रभाव टाकत असते. त्यातून नाट्यबीज सापडत असते. त्यातून नाटककाराला जाणवलेला विशेष जीवनानुभव व्यक्त होत असतो. तोच त्या नाटकाचा केंद्रीभूत जीव असतो. साहित्यकृतीचे घटक कोणत्यातरी आशयसूत्राने, भावबीजाने एखाद्या सौंदर्यतत्त्वाने संघटित एकात्म केलेले असतात.[६] उदा. - औंध संस्थानचे पंतप्रतिनिधी यांना असलेले सूर्यनमस्काराचे अतोनात वेड पाहून आचार्य अत्रे यांना 'साष्टांग नमस्कार' सारखे नाटक लिहावेसे वाटले किंवा माधव काझीची कृष्णकृत्ये पाहून 'तो मी नव्हेच' नाटकाचा जन्म झाला.

**नाट्य कथानक** - कथानक हा नाटकाचा आत्मा. भरतमुनी यालाच नाट्यवस्तू म्हणतात. या कथानकामुळेच नाटक दृश्यरुपात येत असते. नाट्यकथानक कोणत्याही स्वरूपाचे असले तरी विशिष्ट पुरूषार्थ साध्य करण्यासाठी ते असावे अशी अपेक्षा प्राचीन काळी केली जात असे. आजही नाटककाराने यथार्थ मानवी जीवनाचे स्वरूप कथानकातून रेखाटावे ही अपेक्षा असते. कथानकातून मानवी जीवनाचे, मानवी स्वभावाचे रहस्य नाटककाराला उलगडून दाखवता आले पाहिजे. याकरिता सभोवतालच्या व्यवहारात घडून गेलेल्या वास्तव घटनेचे सूत्र घेऊन आपल्या कल्पनेने, प्रतिभेने त्यातील नाट्यरूप शोधतो.

ॲरिस्टॉटलने नाट्यकथानकाविषयी पुढील प्रमाणे भूमिका घेतली आहे. तो 'कथानकाचा अर्थ- प्रसंगांची रचना असा करतो. कथानक हेच शोकांतिकेचे आद्यतत्त्व आणि तिचा आत्मा आहे. कथानकाला आदि - मध्य - अंत असतो. कथानक साधी किंवा संमिश्र असतात; कारण प्रत्यक्ष जीवनातील ज्या कर्मांची अनुकृती कथानकात केलेली असते. त्यातही भिन्नता दिसून येते.'[७] ज्या कथानकामध्ये घटनेची परावृत्ती व अभिज्ञान ह्यांच्याशिवाय स्थित्यंतर घडून येते ती साधी कथानके; आणि ज्या कथानकांमध्ये घडणारी स्थित्यंतरे, परावृत्ती



अनुक्रमणिका

किंवा अभिज्ञान या दोहोंशी निगडित असते ती संमिश्र कथानके होत.

एकूणच कथानक हे साधे, सोपे असले पाहिजे. नाटकावर साहित्यकृती व प्रयोग दोन्हींचे बंधन असल्याने व तो दृक्‌श्राव्य वाङ्मयप्रकार असल्याने नाटकातील कथानक, प्रसंग, घटना अतिशय नेमकेपणाने व सूत्रबद्धरीतीने लिहिलेल्या असल्या पाहिजेत. हे कथानक प्रेक्षकांना भावणारे असले पाहिजे, त्याची विशिष्ट रचना असल्याने कधी हे कथानक शोकांतिकेला जन्म देते तर कधी सुखात्मिकेला.

हे नाट्य, कथानक, नट, त्याचा अभिनय, स्थल, काल, इत्यादी भाषिक आणि अभाषिक नाट्यचिन्हांच्या साह्याने मूर्त होत असतात. कथानकाचा आत्मा म्हणजे नाट्य किंवा संघर्ष. कधी तो दोन पात्रांमधील असतो, कधी दोन प्रवृत्तींमधील असतो, तर कधी नियती आणि माणूस यांच्यातील असतो. कधी सभोवतालची परिस्थिती आणि अगतिक माणूस यांच्यातील असतो. कधी व्यक्ती आणि समाज यांच्यातील, तर कधी सुष्ट आणि दुष्ट रूढी, परंपरा, जुने, नवे इत्यादी विविध गोष्टींमधील हा संघर्ष असतो. या संघर्षातूनच कथानक गतिमान होत असते.

**घटना-प्रसंग** - नाट्य कथानक गतिमान होण्यासाठी त्यातील घटना, प्रसंगांना जिवंत करण्याची प्रतिभा असावी लागते. मुळात कोणत्याही नाटकाचे आशयसूत्र एखाद्या घटनेभोवतीच गुंफलेले असते. त्या घटनेतूनच अनेक प्रसंग निर्माण होत असतात. नाटकातील विविध घटना, प्रसंग वेगळ्या कार्यकारणभावातून निर्माण होत असतात. एक घटना दुसऱ्या घटनेवर अवलंबून असते. दुसऱ्या घटनेची ती कारण असते तर कधी साहचर्य तत्त्वाच्या अनुषंगाने, कधी कालक्रमतत्त्व, संभवनीयतेचे तत्त्व, स्थलतत्त्व इत्यादी संदर्भांना अनुसरून नाट्यप्रसंगाची उभारणी होते.

**पात्र** - नाट्याविष्काराचा आधार-घटक 'पात्र' होय. पात्रांच्या संवादातून हालचालीतून कथानक आकाराला येत असते. कथानक गतिमान बनविणे, कथानकाला कलाटणी देणे, आकार देणे, नाट्यसंघर्ष निर्माण करून शेवटी उत्कर्ष बिंदूपर्यंत कथानक नेण्याचे कार्य पात्र करत असतात. नाटककाराला जो कथाभाग नाटकात दृश्य स्वरूपात वाचकांसमोर, प्रेक्षकांसमोर दाखवायचा असतो त्यासाठी त्याला पात्रांची निवड पहावी लागते. नायक, नायिका, खलनायक व इतर दुय्यम दर्जाची पात्रे नाटकाला आकार देतात. पूर्वीच्या नाटकामध्ये विदूषक हे एक महत्त्वाचे पात्र होते. हा विदूषक सूत्रधाराची भूमिका करीत असे. ॲरिस्टॉटलने नाट्यगत पात्राचे एक स्वायत्त व स्वतंत्र अस्तित्व मानले आहे. तो नाट्यगत पात्राला प्रत्यक्षातील माणसापेक्षा वेगळे मानतो. कारण नाटकाचे जग वास्तव जगापेक्षा वेगळे असते. प्रत्यक्षातील माणूस व नाट्यकृतीतील माणूस एकच मानणे त्याला योग्य वाटत नाही. 'नाटकातील पात्र' ही लेखकाची (नाट्यलेखन पूर्व) सामग्री असते असे नाही; तर ती त्याची स्वतंत्र निर्मिती असते. खेळातून (Play) ती (पात्रं) जन्म घेतात. ती नाटकात कोंबलेली नसतात; किंवा ती बाहेरून लादलेली नसतात.[६] त्यांना स्वतःचे भावविश्व असते. त्यांना प्रत्यक्षातील माणसांप्रमाणे शारीरिक व मानसिक अंगे लाभलेली असतात. प्रा. गंगाधर पाटील म्हणतात, नाटककार व्यक्तीच्या वृत्ती-प्रवृत्ती-भावना-विचार, उक्ती, कृती, तिची विचारप्रणाली, जीवनपद्धती इत्यादींच्या चित्रणातून नाटकात एक माणसाची प्रतिमा निर्माण होत असते. या प्रतिमेला पात्र म्हटले आहे.[७]

प्रत्येक पात्र हे एक स्वतंत्र व्यक्तिमत्त्व असते. ते केवळ नाटककाराचे विचार व भावना मांडण्याचे साधन नाही. पात्रांच्या स्वभावधर्मांवर नाटकाचे कथानक ज्या काळात घडलेले असते त्याकाळातील सांस्कृतिक आणि स्वभावधर्मांवर नाटकाचे कथानक ज्या काळात घडलेले असते त्याकाळातील सांस्कृतिक आणि सामाजिक संदर्भ यांचा प्रभाव पडत असतो. पात्र ही स्थलकालबद्ध असतात. नाट्यसंहितेच्या वैशिष्ट्यपूर्ण चौकटीत त्यांना विशिष्ट अर्थ प्राप्त होत असतात.

पात्रांच्या कृतीमुळे नाटकात घटना-प्रसंग संघर्ष साकार होतात. ही पात्रे संवाद बोलत असतात. हे संवाद पात्रांच्या सामाजिक व सांस्कृतिक दर्जाप्रमाणे असणे गरजेचे असते.

**संवाद** - कथानकाला परमोच्च बिंदूपर्यंत नेण्याचे कार्य संवादाच्या माध्यमातून होत असते. संवाद हे एक नाटकाचे माध्यम आहे. पात्रांच्या संवादांमधून विचारांची व भावनांची देवाणघेवाण होते. पात्रांमधील परस्परसंबंध



अनुक्रमणिका

संवादाद्वारे प्रस्थापित होतो. खरे तर संवादांमधूनच किंवा विसंवादातून नाटक जन्माला येत असते. स्थळ, काळ, अभिनय, नेपथ्य, प्रकाश, रंगभूषा, इत्यादी रंगचिन्हांच्या आश्रयाने निर्माण केलेल्या वातावरणात व विशिष्ट प्रसंगात पात्र एकमेकांशी संभाषण करत असतात. जीवनविषयक मूल्यांची देवाणघेवाण करीत असतात. कथानकाला कलाटणी देण्याचे कामही संवाद करतात व नाटकांचा विकास करण्याचे कामही करतात. हे संवाद नाटकामध्ये निवेदनाचे काम करतात. संवाद पात्रांच्या मनातील, अंतर्मनातील भावभावनांचा आविष्कार करतात व वाचक प्रेक्षकांचे भावोद्दीपन करतात.

आपले रोजचे एकमेकांशी बोलणे व नाटकातील संवाद यामध्ये फरक असतो. नाटकातील संवादांमध्ये उत्स्फूर्तता नसते, तर ते प्रसंगानुरूप बेतलेले असतात, विशिष्ट प्रकारच्या अभिनयासाठी लिहिलेले असतात. त्यांचा अर्थ देखील केवळ वाच्यार्थ नसतो. तो लाक्षणिक किंवा व्यंग्यार्थ असतो. या संवादांमुळे क्रिया, प्रतिक्रिया निर्माण होतात. पात्रांच्या परस्पर संवादातून नाटक आकाराला येत असते, म्हणूनच व्यवहारातील संवादांपेक्षा नाटकातील संवाद अधिक गुणवत्तेचे असतात.

नाटकातील पात्रापात्रांमधील संघर्ष टोकदार करण्याचे काम संवाद करीत असतात. पात्राचे स्वभावविशेष प्रगट करण्याचे, वाचकाचे, प्रेक्षकांचे लक्ष एखाद्या गोष्टीकडे वेधून घेण्याचे, तसेच नाटकातील जीवनार्थ सौंदर्यात्मक पातळीवर पोहोचवण्याचे कामही संवाद करतात.

विशिष्ट नाटक प्रकारानुसार संवादाचे देखील विशिष्ट प्रकार व विविध शैली अपेक्षित असतात. नटाच्या अभिनयाशी संवादाचे घनिष्ट नाते असते. नाट्यसंवादात दोन व्यक्ती एकमेकींमध्ये भावनिकतेने गुंतलेल्या असतात. त्यांच्या भावनिक क्रिया प्रतिक्रियांमधून त्यांचं बोलणं स्फुरत असते. या बोलण्यातून ते दोघेही अभिव्यक्त होत असतात. संवाद हा प्रेक्षकांपुढे घडत असतो व तो प्रसंग घटना समक्ष घडवीत असतो. संवादामध्ये तीव्रता, उत्कटता, आवेग असतो, ताजेपणा असतो, नवेपणा असतो. नाटकातील शब्द हा पात्रांच्या कृतींवर भर देतो तेव्हा संवाद निर्माण होतो.

**भाषा** - नाटकाचे जे विविध प्रकार आहेत; त्या प्रकारानुसार नाटकाची भाषा बदलत असते. संवादातून भाषा व्यक्त होत असते. नाटककाराला जाणवलेले द्वंद्व त्यातून पात्र प्रसंगांचा जन्म आणि ते साकार करण्यासाठी शब्दरूप संवादांचा वापर ही प्रक्रिया लक्षात घेतली तर शब्द हे नाट्यसंहितेचे उघड माध्यम ठरते.[१०] भाषेमुळे नाटकाला एक स्थान, एक दर्जा प्राप्त होत असतो, कारण भाषेला विशिष्ट अर्थ असतो, संदर्भ असतो, वैशिष्ट्यपूर्ण संस्कृतीचे दर्शन त्यातून होत असते. शब्द हे भाषा व्यक्त करण्याचे साधन आहे. नाटककार नाट्यनिर्मिती करताना भाषेचा वेगवेगळ्या प्रकारे उपयोग करतो. नागरी, ग्रामीण बोलींचा वापर पात्रांच्या दर्जाप्रमाणे करीत असतो. कथानकाला कलाटणी देणे, कथानक परमोच्च बिंदूपर्यंत नेणे, पात्रांचा घटनांचा विकास करणे, हे कार्य भाषेद्वारे होत असते.

नाटकाच्या भाषेचा विचार करताना ॲरिस्टॉटल भाषेमध्ये वर्ण, अक्षर, अव्यय, नाम, क्रियापद, प्रत्यय, विभक्ती, वाक्य या भाषिक घटकांचा समावेश करतो व प्रत्येक घटकाचे स्वतंत्र विवेचनही करतो. हे विवेचन प्रामुख्याने व्याकरणिक अंगाने केलेले असते.[११] भाषा विचारात, शब्दविचार अपरिहार्य ठरतो. एक विशिष्ट भाषिक अर्थ धारण केलेला हा शब्द जेव्हा रंगभूमीवर 'रंगचिन्ह' म्हणून येतो, तेव्हा त्याला विशिष्ट अर्थ आणि संदर्भ मिळत असतात. शब्दाला लाभणारे दोन अर्थ. त्यापैकी एक सामान्य अभिधेयार्थ व दुसरा रंगार्थ हा लक्षणार्थ असतो. त्यामुळेच नाटकाची भाषा ही कधी काव्यात्म, कधी भाववाही, कधी अलंकृत तर कधी विचारवैभव प्रकट करणारी असते. कधी अमूल्य गुण प्रगट करून पात्रांना प्रभावित करते, कधी आलंकारिक आणि काव्यात्म बनून योग्य त्या ठिकाणी नाट्यार्थ साकार करते. भूत, वर्तमान घडामोडींची माहिती देते आणि निवेदनाचे कार्य करते. अशा प्रकारे भाषा ही अर्थपूर्ण शब्द, वाक्य यांच्याद्वारे नाट्यार्थ व्यक्त करून नाट्यसौंदर्य निर्माण करत असते.

अनेक नाट्यधर्मी घटकांनी मिळून नाट्यकृती जन्माला येत असते. हे घटक इतर साहित्यप्रकारांपेक्षा असलेले वेगळेपण सिद्ध करतात. नाटक ही मानवी जीवनात घडून गेलेल्या काही घटना प्रसंगांची नाट्यपूर्ण अनुकृती असते. त्याला नटाकडून आकार मिळतो. म्हणून अभिनय नाटकाचा शारीर घटक असतो. अभिनयाच्या माध्यमातून



अनुक्रमणिका

नाटक प्रेक्षकांपर्यंत पोहोचवले जाते. ज्ञानावरोबर मनोरंजन करणे हेच नाटकाचे वेगळेपण आहे.

**संदर्भ :**


१. केतकर गोदावरी, भरतमुनींचे नाट्यशास्त्र (दुसरी आवृत्ती), पृ. १३६.

२. देशपांडे ग. त्र्यं., भारतीय साहित्यशास्त्र (तिसरी आवृत्ती),. पृ. २६७

३. कानेटकर, वसंत, नाटक एक चिंतन, पृ. १२

४. नाईक राजीव, तापस विजय (संपा.), रंङ्नायक, प. २३५

५. कित्ता, पृ. २३६

६. पाटील गंगाधर, समीक्षेची नवी रूपे, पृ. ४६.

७. करंदीकर गो. वि., ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र , पृ. ६८-६९, ७१२

८. राजापुरे तापस, डॉ. पुप्पलता, खानोलकरांची नाट्यसृष्टी, पृ. ३८

९. पाटील गंगाधर, उपरोक्त, पृ. २४७

१०. कानेटकर वसंत, उपरोक्त, पृ. ९

११. करंदीकर गो. विं., उपरोक्त, पृ. ८५


❖❖❖


**प्रा. डॉ. (सौ.) श्रद्धा सं. सोमण**

विनायक स्मृती, बदलापूर गाव, बदलापूर (प.)

जिल्हा ठाणे. फोन : ९४२२४७७५९१


---

## नवे आजीव सभासद

१) तेलंग प्रकाशचंद्र लक्ष्मणराव, जळगाव
२) राठोड राजाराम गिण्यादेव, राजापूर
३) इटकर सचिन चंद्रशेखर, पुणे
४) देशमुख आनंदी विकास, नीरे
५) जोशी संजय भास्कर, पुणे
६) पाटील रतन हंबीरराव, शिराळा
७) तडवळकर पुरुषोत्तम गोविंद, पुणे
८) पवार रामचंद्र कृष्णा, भोसरी
९) ऊदास श्रीकांत श्रीराम, पुणे
१०) सुपेकर भालचंद्र सुभाष, पुणे
११) दुनाखे गिरीश दिवाकर, सोलापूर
१२) कुलकर्णी वीणा दिलीप, सोलापूर
१३) सुर्यनारायण गुंडाप्पा रथोजी, सोलापूर
१४) देशमुख शिवाजीराव मारूती, सोलापूर
१५) सर्जे अनिल काशिनाथ, सोलापूर
१६) देशमुख तानाजी अंबादास, सोलापूर
१७) मोरे शांतकुमार यशवंत, सोलापूर
१८) व्हटकर मनोज नरसिंह, सोलापूर
१९) पाटील भिमगोडा रामगोडा, सोलापूर
२०) देवसाळे आदिनाथ गुलाबचंद, सोलापूर
२१) कोठावळे राजेंद्रकुमार गंगाराम, सोलापूर
२२) पाटील शंकर मल्लीकार्जुन, सोलापूर
२३) चौगुले मोहन परशुराम, भटवाडी
२४) हळवे अविनाश परशुराम, पुणे
२५) मोरे तानाजीराव निवृत्ती, पुणे
२६) पाटील शिवाजीराव लक्ष्मणराव, पुणे
२७) चोरघडे मुंजाजी रंगनाथराव, बारखेड
२८) कोळपे अभिजीत दत्तोवा, पुणे
२९) शिदोरे मीनाक्षी दीपक, पुणे
३०) जोशी भारती शिरिष, ठाणे
३१) परांडेकर वर्षा वासुदेव, ठाणे
३२) दोंडे अरविंद धोडोपंत, ठाणे
३३) देशमुख वनिता शरदच्चंद्र, ठाणे
३४) पुळेकर विवेकानंद रामकृष्ण, ठाणे
३५) चाफेकर अरुणा अरविंद, ठाणे
३६) देशकुलकर्णी जयश्री सुभाष, पुणे
३७) शाह मीनल महेंद्र, पुणे
३८) कोरे रमेश गंगाधर, पुणे
३९) गडदे मीनल महेंद्र, सोलापूर
४०) खरवस आनंद पांडूरंग, सोलापूर
४१) पाटील आशा अरुण, सोलापूर
४२) रोकडे कल्पना सुभाषचंद्र, सोलापूर
४३) माटेकर रणजित दासोपंत, सोलापूर
४४) करमरकर श्रीवल्लभ वासुदेव, सोलापूर
४५) भोसले मिलिंद दत्ताजीराव, सावंतवाडी
४६) वाटवे हरिहर गजानन, सावंतवाडी
४७) बांदेकर प्रवीण दशरथ, सावंतवाडी
४८) काजरेकर गोविंद गंगाराम, सावंतवाडी
४९) देशमुख दीपक निळकंठ, पाथर्डी
५०) ढाकणे गंगाधर पंढरीनाथ, पाथर्डी
५१) आहेर वैशाली भानुदास, पाथर्डी
५२) पालवे दत्तप्रसाद ज्ञानदेव, पाथर्डी
५३) गर्जे अमोल अशोक, पाथर्डी
५४) चव्हाण शंकर बालाजी, पाथर्डी
५५) चौरे बबन आश्रुबा, पाथर्डी
५६) केकाणे सुभाष श्रीमंतराव, पाथर्डी
५७) भणगे सुरेश भालचंद्र, मोहरा देवी
५८) ढाकणे अनिल जगन्नाथ, पाथर्डी
५९) ईजारे कल्पेश प्रभाकर, पाथर्डी
६०) पाथरकर रवीन्द्र त्रिंबकराव, पाथर्डी
६१) पवार रमेश मोतीराम, कोकीसपीर तांडा
६२) राठोड सुदाम नारायण, शेकुंचा तांडा
६३) दराडे संजय माणिकराव, पाथर्डी
६४) चोपडा अमृत पोपटलाल, मोहाटा
६५) पाठक रवींद्र रंगनाथ, पाथर्डी
६६) जायभाये राजेंद्र महादेव, पाथर्डी
६७) मेहरकर संजय दगडू, पाथर्डी
६८) कुलकर्णी हृषीकेश रामप्रसाद, पाथर्डी
६९) शेख मुक्तार फकीर, निसगांव
७०) दौंड कैलास रायभान, सोनोशी
७१) दहीफळे संतोष विक्रम, पाथर्डी
७२) पगारे नथुवेल योहान, पाथर्डी
७३) रोडी वैभव विलासराव, पाथर्डी
७४) व्यवहारे अशोक भानुदास, पाथर्डी
७५) बाहेती संदीप दगडूराम, पाथर्डी
७६) गरड आदिनाथ अच्युतराव, पाथर्डी
७७) मरकड दादा एकनाथ, फलाके वाडी
७८) बद्रे संतोष हरिभाऊ, पाथर्डी
७९) फुंदे शिवाजी सुखदेव, मोहटे
८०) भांगे तुकाराम विनायक, पाथर्डी
८१) गर्ते मृत्युंजय गंगाधर, पाथर्डी
८२) खेडेकर नितीन ज्ञानदेव, पाथर्डी
८३) इंदापवार देविदास रामचंद्र, खराडी
८४) डोंगरे योगेश बाबुराव, पाथर्डी
८५) बांगर दत्ताराम भगवंतराव, पाथर्डी
८६) हंडाळे श्रीधर गिनाजी, हडाळवाडी
८७) ढाकणे प्रताप बबनराव, पाथर्डी
८८) गर्जे अशोक नाथ, पाथर्डी
८९) कराड किशोर एकनाथ, पाथर्डी
९०) बऱ्हाटे काशिनाथ विनायक, अन्वलपूर
९१) डुड्ळ आनंद वसंत, परनवाडा
९२) घुले अंबादास शामराव, अमरापूर

(पान क्र. ४७ वर पहा...

# लोकबंधांचे नाट्याविष्कार

- प्रा. (डॉ.) अनिल सहस्रबुद्धे

*[ नाट्याविष्काराचे बीजरूप (neucleus) लोकबंधात आहे. लोकविधी, लोकरूढी आणि लोकसमजुतींचा आविष्कार अखेर गायन-नर्तन-क्रीडा यातून होतो. लोकसाहित्याचे ते नैसर्गिक न्यायतत्त्व आहे. दृक-श्राव्य कलेचे मूळ शोधण्यासाठी ह्या आदिबंधाचे मानवी जीवनाशी, लोकजीवनाशी, असणारे अतूट नाते समजून घ्यावे लागते. नाट्याविष्कार हा कधीही एकाकी नसतो. नाट्यछटा, एकपात्रीप्रयोगही एका व्यक्तीने आपल्या अभिनयकौशल्यातून लोकदर्शनच घडविलेले असते. लोकबंधाचा नाट्याविष्कार म्हणजे नाट्याविष्काराची अंकुरावस्था होय. जन्मविधीपासून ते श्राद्धविधीपर्यंत आणि 'अडगुले-मडगुले' पासून ते महानाट्याविष्काराच्या मुळाशी लोकबंधाचे अविभाज्य अस्तित्व, विधी आणि क्रीडाविष्काराने, कसे अंकुरतात आणि विस्तारतात; त्या सूक्ष्म वाटचालीचे हे मार्मिक विवेचन आहे. नाट्यरुपाच्या (दृक-श्राव्याच्या) '...भिन्नरुचिर्जनस्य एकम् समाराधनम्' का आहे; त्याचेही लोकविज्ञान समजण्यास नव्याने विचार करावयास लावणारे आहे.*

*- संपादक ]*

लोकजीवनातील नाट्याविष्कारांचे स्वरूप समजावून घेण्याचा प्रयत्न येथे करावयाचा आहे. लोकजीवनातील नाट्याविष्कार 'विधी' आणि 'खेळ' या दोन स्वरूपात घडतात. 'विधी', लोकजीवनाच्या धारणाशक्तीचे सनातन आधार असतात. हे आधार समूहमनाचीच निर्मिती असते. जीवनमूल्यांचे महत्त्व या आधारांना अर्थात् विधींना असते; तर 'खेळ' ही लोकजीवनाची रंजन-परंपरा असते. या दोन्ही आविष्कार समूहसापेक्षच असतात. मात्र विधींमधून समूहमनाची धर्मभावना, दैवतांशी शरण्यभाव प्रकट होतात. खेळातून मनोरंजन आणि जीवनदर्शनासह प्रबोधन घडत असते. हे दोन्ही आविष्कार लोकरंगभूमीवरील लोकबंधाचे नाट्याविष्कारच असतात.

'लोकबंध'ची व्याख्या स्पष्ट करताना, मी (अनिल सहस्रबुद्धे) 'लोकबंध' या ग्रंथात पुढील विधान केले आहे, 'अनुभूतीतून तयार होत गेलेला, 'लोक'धारणेसाठी कार्यान्वित झालेला, परंपरेत लवचिकतेने परंतु मूलभूतपणे वाहत राहणारा, सनातनांतून आलेला, वर्तमानात जाणवणारा, भविष्यकाळात प्रकटण्याची क्षमता असणारा, लोकमानसातील जाणिवेचा आनंद किंवा सौंदर्यभावनाप्राप्त कल्पनाप्रवाह म्हणजे 'लोकबंध' होय. 'लोकबंध' हे वर्तनपद्धतीतून, विधीस्वरूपातून, चिन्हे, प्रतीके, प्रतिमा यांतून आणि या सर्वांच्या भाषिक रूपातून प्रकट होतो. अशा विविध प्रकारे 'लोकबंध' प्रकट करण्याची 'लोक'ची धडपड असते.'[१] थोडक्यात, 'लोकबंध' (Folk Type/Folk Element) (लोकतत्त्व) हे 'लोक'चे धारणातत्त्व अर्थात् धारणासूत्र असते. 'लोकबंध' हे समूहमनाचे सनातन अस्तित्वरूप असते. हे लवचिक, परिवर्तनशील, वर्तमान असते. 'लोकबंध' 'लोक'च अस्तित्वात ठेवतात. लोकबंधांचे प्रकटीकरण म्हणजे 'लोकसाहित्य'. समग्रता आणि परिवर्तनशीलता या गुणांसह लोकबंध आविष्कृत होत असतात. लोकबंधाचे नाट्याविष्कार, लोकजीवनाचे समग्र आणि परिवर्तनशील दर्शन घडवितात.

**अ) प्रयोगसिद्ध वाङ्मयकला आणि लोकरंगभूमी :**

'लोकसाहित्य एक स्वतंत्र अभ्यासक्षेत्र' या ग्रंथात संपूर्ण लोकसाहित्य ही 'प्रयोगसिद्ध वाङ्मयकला' आहे असे प्रतिपादन करताना डॉ. मोरजे लिहितात. 'लोकसाहित्याच्या अभ्यासकांनी लोकसाहित्याची (१) मौखिक (२) भौतिक संस्कृती (३) लोकरूढी-विधी-समजुती ही तीन अंगे सांगून लोकसाहित्याचे चौथे अंग म्हणून लोकसाहित्य ही एक प्रयोगसिद्ध कला (Performing Folk-art) असे म्हटले आहे. त्यात लोकनृत्ये, नृत्यखेळ, विधिनाट्य आदि गोष्टींचा समावेश केलेला आहे. वास्तविक असे करण्याचे कारण नाही.'[२] हे सांगताना पुढे ते असे म्हणतात, 'लोकसाहित्यातील वरील सर्व अंगे ही लोकसाहित्य-प्रयोगाची अंगे आहेत.

त्या अंगास स्वतंत्र असे स्थान नाही.'[३] म्हणजे 'लोकसाहित्य' अनुभवास येते; तेच मुळी 'प्रयोगसिद्ध वाङ्मयकला' या तऱ्हेने; असे त्यांचे म्हणणे दिसते. हे डॉ. मोरजे यांचे म्हणणे थोड्या सावधगिरीने मान्य करता येईल. 'लोकसाहित्याचा कलात्मक आविष्कार' या 'लोकसाहित्यविचार' पुस्तकातील उल्लेखात मी 'डॉ. सहस्रबुद्धे) विवेचन केले आहे- 'कला हे मानवी जीवनातील आनंद मिळविण्याचे साधन आहे. एका बाजूला कलानिर्मिती करण्याचे कार्य मानव करतो; तर दुसऱ्या बाजूला ह्या कलेच्या आविष्कारातून आनंद अनुभूती घेणेही त्याचे चाललेले असते. कला आणि कलेचा आविष्कार म्हटले की, त्यासाठी ठरीव अशी एक पद्धती, नियमबद्धता आलेली दिसते. ही पद्धती अर्थातच भावात्मक आणि रचनात्मक सौंदर्य वाढविण्यासाठी अवलंबिलेली असते. कलेचे नियम हे विकसनशील असतात, लवचिक असतात. कलेला मुख्यतः तीन घटक अपेक्षित असतात- कलावंत, कलावस्तू आणि रसिक. कलेची निर्मिती हेतुतः केलेली असते. सौंदर्यभावना ही जरी नैसर्गिक किंवा अलौकिक देणगी आहे असे म्हटले; तरी कलानिर्मिती मात्र मानवाची कृती ठरते.'[४] म्हणूनच 'लोककला आणि लौकिककला' ही स्वरूपे विचारात घ्यावी लागतात. या दोहोंतही समूहमन ओतप्रोत भरलेले असले तरी एक समूहमनाची निर्मिती व परंपरा असते तर दुसरी समूहमनस्कतेने केलेली व्यक्तिनिर्मिती असते. दुसरी गोष्ट म्हणजे रसिकसापेक्षता. या बाबतीत डॉ. मोरज्यांचे म्हणणे समग्र लोकसाहित्याच्या संदर्भात अतिव्याप्त ठरेल. मात्र विधी, विधिनाट्ये आणि गंमत (तमाशा) आदि गोष्टींसाठी विचारात घ्यावे लागते.

या सर्व विवेचनाचा विचार करता लोकबंधाचे नाट्याविष्कार हे रसिकसापेक्ष, हेतुसहित, आणि समूहमनाचा धारणात्मक आविष्कार म्हणूनच होतात; या निष्कर्षाप्रत ओघानेच यावे लागते. 'लोकरंगभूमी'चा विचार अभिजात किंवा नागर-रंगभूमीच्या तुलनेत करताना समूहमनाच्या धारणात्मकतेचे परिमाण लावूनच; सौंदर्यभाव आणि रंजनात्मकतेचा विचार करावा लागतो.

लोकरंगभूमीचा विचार एकूण रंगभूमी आणि नाट्यशास्त्राच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचा आहे. अभिजात कला म्हणून नाट्यकला विकसित झाली, या गोष्टीलाही भरतमुनींच्या नाट्यशास्त्रांपासूनचा पारंपरिक आधार आहे. जागतिक पातळीवरील प्राचीनतम परंपरा म्हणून ग्रीक रंगभूमीचा विचार केला असता; नाट्यशास्त्र विकसनाला आता हजारो वर्षांची परंपरा आहे, असे म्हणता येईल. मराठी रंगभूमीचा विकास अभ्यासला तर विष्णुदास भाव्यांच्या कामगिरीपासूनची परंपरा आहे. असे लक्षात येते. या अभिजात स्वरूपातील, नाट्यशास्त्रीय विकासाला, लोकरंगभूमीचा भक्कम पाया सतत लाभला आहे. किंवहुना लोकरंगभूमीतून अभिजात रंगभूमीचा विकास झाला आहे, हे नाकारता येत नाही. येथे एक गोष्ट स्पष्टपणे लक्षात ठेवणे आवश्यक आहे की; नाट्यकला अभिजातकला म्हणून विकसित होताना या कलेचा हेतु निखळ रंजन ठरला आहे. या कलेमधून प्रबोधन घडले तरी; तो दुय्यम भाग होता. धर्मधारणेपासून तर नाट्यप्रयोग पूर्णतः दूर गेले. लोकरंगभूमीचा मूलभूत हेतू धर्मधारणा आणि प्रबोध हा होता. तो गळून पडला असला तरी आविष्काररूपे गळून पडणे अशक्य होते. त्यामुळे लोकरंगभूमीची मूलभूतता सतत जाणवत राहिली. अगदी अलीकडील काळात नागर रंगभूमीवर घडलेल्या प्रयोगांमध्ये लोक आविष्काररूपे वापरल्यामुळे रंगभूमीला सनातनाचे आणि वैश्विकतेचे परिमाण लाभले हे 'घाशीराम कोतवाल', 'हयवदन', 'लोककथा ७८', 'खंडोबाचं लगीन', 'अजब न्याय वर्तुळाचा' ही रूपांतरित नाटके आणि 'महानिर्वाण' इ. नाटकांवरील लोकाविष्कारांच्या मांडणीची अनेक उदाहरणे एकत्रित स्वरूपात, तज्ज्ञांच्या मतांच्या आधारे, डॉ. प्रभाकर मांडे यांनी दाखवून दिली आहेत.[५] यासंदर्भातील विवेचनात डॉ. तारा भवाळकर लिहितात, 'रंजनाला प्राधान्य येते व प्रयोगातील अन्य घटकही रूपांतरित होऊन व परिमार्जित होऊन पुढील टप्प्यात संक्रमित होत असतात. विधिनाट्यात सर्व कलाघटक उपस्थित असतातच. मात्र त्यांच्या अस्तित्वाची जाणीव नसते. धर्मश्रद्धेचाच पगडा इतका जबरदस्त असतो की, तिच्या पोटात सगळे कलाघटक एकरूप होऊन सामावलेले असतात.'[६] लोकरंगभूमी ही, शास्त्रीय रंगभूमीच्या किंवा नागर रंगभूमीच्या अथवा अगदी अत्याधुनिक नाट्यतंत्रासह सादर होणाऱ्या रंगभूमीच्या आविष्कारात, अंतःप्रवाहित असते; कारण लोकरंगभूमी हे समग्र 'लोक'च्या

लोकबंधाचे आविष्काररूप असते.

लोकबंधांच्या आविष्कारांचे लोकरंगभूमी म्हणून काही स्तर निश्चित करता येतात; (१) **कथासादरीकरण** - यात गोष्टीवेल्हाळ व्यक्तींचे (लोकघटकांचे) कथाकथन, कीर्तकार, पुराणिक यांचे सादरीकरण समाविष्ट होते. (२) **क्रीडा उपासक** - माकडवाले, अस्वलवाले, उंटवाले, कोल्हाटी, वाघवाले, डोंबारी अशा खेळकऱ्यांचा समावेश होतो. (३) **संस्कृती उपासक** - नंदीबैलवाले, नागवाले, वासुदेव, पांगुळ, जोशी, सहदेव भाडळी, भुत्ये, कडकलक्ष्मी किंवा पोतराज, जोगतीण, बहुरूपे, चित्रकथी, मसणजोगी इ. उपासकांचा समावेश होतो. (४) **विधीनाट्ये** - जागरण, गोंधळ, कलगीतुरे, बोहाडा, कीर्तन, पुराणिक, भारूड, मंत्रतंत्र जादूटोणे करणारे; मांत्रिक तांत्रिक इत्यादींचा समावेश होतो. (५) **जत्रायात्रा सणोत्सव प्रसंगी** - सुंबरान, बोहाडे, गंमतखेळ, दशावतारी खेळ, वाघबारस, लळीते, वैशिष्ट्यपूर्ण नृत्ये यांत स्त्रीनृत्ये, पुरुषनृत्ये, स्त्रीपुरुषनृत्ये यांचा समावेश होतो. खम दंडार हे प्रकारही या स्तरात मोडतात. होळी, दिवाळी, जन्मोत्सव, लग्नोत्सव, मर्तिकोत्सव, कृषक्विधिविधाने यांचा यात समावेश होतो. (६) लोकनाट्य अर्थात् तमाशा किंवा गंमत जलसे, कलापथके, मेळे, दशावतारी खेळ, संगीतबारी, कलावंतिणीच्या बाऱ्या, माड्या, कोल्हाटीणीचे प्रयोग, खणीवैठका, तृतीयपंथीयांच्या टोळ्या. (७) पुरोहितांचा वर्ग - यांत विधीपरंपरा, व्रतवैकल्ये इ. करवून घेणारे भटजी किंवा ब्राह्मणपुरोहित आणि यातुक्रिया करवून घेणारे यातुधान यांचा समावेश होईल.

या स्तरातील सहावा स्तर धार्मिकतेपासून किंवा धर्मधारणाविषयक लोकबंधापासून दूर होऊन केवळ रंजनप्रधान झाला आहे, असे विशेषत्वाने जाणवत असले तरी त्यातही धर्मधारणेची अंतःसूत्रे अर्थात् लोकबंध प्रवाहित असतातच. लोकरंगभूमीची जीवनाच्या समग्र धारणात्मकतेशी असलेली नाळ; हे स्तर लक्षात घेताही उमजते; म्हणून लोकबंधाचे नाट्याविष्कार म्हणजेच लोकरंगभूमी. विधीविधाने, संगीत आणि अभिनय यासह रंगभूमीचे प्रेक्षकसापेक्षतेसह सर्व घटक लोकरंगभूमीमध्ये समाविष्ट असतात.

**ब) लोकबंधाच्या नाट्याविष्काराचे स्वरूप :**

अ) लोकरंगभूमी हे लोकबंधाचे आविष्काररूप असल्यामुळे; लोकरंगभूमी हे 'लोक' अस्तित्वाचे भावात्मक असे व्यवच्छेदक अंग असते. सादरकर्ते, सादरीकरण वस्तु किंवा घटक आणि भोक्ते किंवा प्रेक्षकस्त्रोते, सादरीकरणासाठी मौखिक, भौतिक आणि संगितिक सामग्री हे सर्व घटक या रंगभूमीला असतातच असतात. त्यातील वैशिष्ट्य म्हणजे सादरीकरणात सादरकर्ते आणि भोक्ते असे थेट विभाजन करता येत नाही. हे दोन्ही घटक दोन्हीही भूमिका आपापल्या परीने बजावतात. रंगमंच, प्रेक्षागार, नेपथ्य असे अभिजात रंगभूमीवरील विभाजन येथे थेट स्वरूपात नसतेच. सादरकर्ते आणि भोक्ते दोन्ही स्तरावरील 'लोक' पूर्णतः एकात्मतेने लोकबंधाचे आविष्करण धर्मश्रद्धेने आणि धारणासंवेदनेने करीत असतात. ते सादरीकरण हा 'लोक'च्या जीवनसाधनेचा भाग असतो. रंजकता आणण्याचा प्रयत्न हा जीवनसाधनेतील ताण कमी करण्यासाठीचा स्वाभाविक भाग असतो. कथासादरीकरण, क्रीडाउपासक आणि लोकनाट्यांच्या प्रयोगात रंजकतेला प्राधान्य असले तरी लोकधारणेला, धर्मधारणेला आवाहन असतेच. त्याचबरोबर भोक्तेही प्रसंगी सादरीकरणात हस्तक्षेप करून पारंपरिक बंधांसह, कल्पनांसह आणि अपेक्षांसह प्रयोग घडवून आणण्यात सहभागी होतात. पात्रांच्या संवादात, वर्तनात, अभिनयात, नेपथ्यातही अर्थातच संहितेतही हा हस्तक्षेप असतो. प्रयोगांची लिखित आणि शास्त्रीय-संहिता येथे अभिप्रेत नसतेच. या प्रयोगांची संहिता लोकबंधाच्या स्वरूपात लोकमानसात घट्ट असते. सादरकर्त्यांच्या सादरीकरणातील उणीवा प्रसंगी भोक्ते भरून काढतात. 'पारंपरिक नाट्यरूप लोकोत्सव' या ग्रंथात डॉ. संजय देशमुख यांनी नाट्यरूप लोकोत्सवामधील प्रेरणा, प्रकार, शाब्दघटक, नृत्य-संगीत, रंगभूमी क्रीडास्वरूपी रूपकांचे सादरीकरण इ. घटकांच्या संदर्भात केलेले विवेचन वरील विवेचनास पुष्टी देणारे आहे.[७] डॉ. दिनकर कुलकर्णी यांनी कथागीत सादरीकरण परंपरांच्या संदर्भात केलेले क्षेत्रीय सर्वेक्षण या दृष्टीने लक्षणीय आहे.[८] या संदर्भाचा इत्यर्थ हा की, लोकरंगभूमी हे लोकबंधांचे आविष्काररूप असल्याने जगण्यातील धारणा संवेदना

त्यातून सादर होत असते. त्यामुळे कलात्मक घटकांपेक्षा लोकबंध प्रकटीकरणाच्या अर्थात् लोकसाहित्य-प्रयोगाच्या सफलतेला, जीवनसाफल्याचे परिमाण लाभून हे प्रयोग एकात्म भावनेने सादर होत असतात. धर्मश्रद्धा, दैवतधारणा हा 'लोक'अस्तित्वाचा सर्वस्वी मूलाधार असतो. लोकरंगभूमीवरील प्रयोग हे त्याचे दृश्यरूप होय.

ब) नेपथ्य, रंगभूषा, वेशभूषा आदि सर्व घटकांना श्रद्धा आणि परंपरांचे मूल्य असते. खेळकऱ्यांच्या संदर्भातही हे परिमाण लावता येते. संस्कृती उपासकांचा आणि विधिनाट्याचा साजवाज ठरीव अर्थात् पारंपरिक असतो. भौतिक सामग्रीलाही धर्मश्रद्धेचे परिमाण असते. बोहाड्यांसारख्या किंवा ललितांसारख्या प्रकारातील मुखवटे किंवा सोंगे हीदेखील श्रद्धेच्या लोकबंधाने भारलेली असतात. लोकरंगभूमीवरील भौतिक-सामग्री-मांडणीचे पारंपरिक तंत्र असते. त्यातही विधीनिषेध-लोकबंधाचे परिमाण महत्त्वाचे असतात. सहभागी कलावंतांच्या जागा, वाद्ये, प्रयोगातील श्रद्धापूर्ण माहात्म्य ठरलेले असते. त्यानुसार त्यांच्या मानापानालाही लोकबंधाचा आधार असतो. गंमत,तमाशा इ. लोकांना रंगभूषा, वेशभूषा इ. गोष्टींचा विचार प्रेक्षक आणि श्रोते यांच्या सापेक्षतेने करता येतो. खेळकरी लोकही असे स्वातंत्र्य घेतात. असे असूनही लोकमानसातील त्यांच्या विषयीचे लोकबंध लक्षात घेऊन असे बदल केले जातात. त्यामुळे गंमत, तमाशा इ. आणि खेळकरी यांच्या सादरीकरणातील रंगभूषा, वेशभूषा इ. सामग्री स्थलकालसापेक्षतेने आणि प्रामुख्याने प्रेक्षकसापेक्षतेने बदलण्याइतपत लवचिक असते. धर्मश्रद्धेपासून दूर जाण्याकडे त्यांचा अधिक कल असतो. लोकधर्मीमधून नाट्यधर्मीकडे त्यांचा प्रवास अधिक असतो.

क) लोकरंगभूमीवरील संगीत परंपरा मंत्रसामर्थ्याने वावरत असते. नर्तन, वादन आणि गायन या तीनही गोष्टींना लोकबंधाचा आधार असतो. त्यात वाद्यपरंपरा, नर्तनपरंपरा आणि गायनपरंपरा या प्रामुख्याने दैवते आणि विधी यांशी सापेक्ष असतात. त्यात कलात्मकता असतेच, तथापि धर्मश्रद्धेच्या प्रभावापुढे तिकडे सादरकर्ते आणि भोक्ते या दोघांचेही फारसे लक्ष नसते. विविध विधीनाट्ये, संस्कृती उपासक आणि खेळकरी यांच्या संगीतपरंपरा, जलसे, तमाशागंमत, संगीतवारी या रंजनप्रधान लोककलांमध्ये व्यामिश्रतेने आलेल्या दिसतात. हा त्यांचा प्रवास नाट्यधर्मी घटकांकडे होत आहे असे म्हणता येते. लोकरंगभूमीच्या सर्व स्तरांचा विचार केला तर संगीतपरंपरांना धर्मश्रद्धाविषयक लोकबंधाचा आधार असतो, असे सतत जाणवत राहते.

लोकरंगभूमीवरील विशिष्ट लोकसंस्थांची वाद्ये असतात. ती वाद्ये लोकबंध स्वरूपातच अविभाज्य अंग होऊन वापरली जातात. उदा. गोंधळ्यांचे संबळ, वाघ्यांचा डफ, खंजिरी, वासुदेवाच्या चिपळ्या इ. उदाहरणे यासाठी पुरेशी आहेत. तंतुवाद्यांच्या बाबतीतही अशी वैशिष्ट्ये आढळतात. या वाद्यांचा नुसता आवाज ऐकू आला, तरी त्या त्या लोकसंस्था लोकबंधात्मकतेने संपूर्ण परिवेशासह डोळ्यापुढे उभ्या राहतात. उदा. कीर्तन, जागरण, गोंधळ इ.

गायनाच्या बाबतीत दोन तऱ्हेने सादरीकरण घडते. एक म्हणजे मुक्तछंद स्वरूपात लयबद्ध शब्द सादरीकरण. खेळकरी लोक या तऱ्हेचे सादरीकरण करतात. त्या लयबद्ध शाब्द सादरीकरणाची संहिता तयार असावी इतके साम्य त्या त्या संस्थेच्या संदर्भात विविध स्थली होणाऱ्या खेळांतून जाणवते. दुसरे म्हणजे वाद्यसाथीने म्हणावयाची गाणी. या गाण्यांचे रचनाबंध, चाली, आरोह-अवरोह, समेवरील झील या सर्व गोष्टी लोकबंधात्मकतेने पारंपरिक असतात. या लोकसंस्थांच्या गायनप्रसंगी स्फुट होणारे घोषही ठरीव असतात. उदा. जागरणातील 'सदानंदाचा येळकोट', गोंधळातील 'उधेकार' इ. रंजनप्रधान लोककलामधील गायनातही ही वैशिष्ट्ये आढळतात.

नर्तनपरंपराही लोकबंधात्मकतेने प्रकटतात. या नर्तनपरंपरांना विधीसामर्थ्य प्राप्त झालेले असते. उदा. वासुदेवाचे नर्तन, गोंधळ्याचे नर्तन, मुऱ्हाळीचे नर्तन, मांत्रिकाचे वारी नर्तन इ. रंजनप्रधान लोककलांमध्ये अभिनय, पदन्यास, मुद्रा यांसह नृत्य विकसित झालेले दिसते. त्याचे स्पष्टीकरण थेट भरताच्या नाट्यशास्त्राप्रमाणे करता येते. रंजनप्रधान लोककलांच्या आधाराने नाट्यशास्त्रातील विवेचन केले असावे काय ? कारण भरताच्या नाट्यशास्त्रात नाट्य खेळांची उदाहरणे दिलेली आढळतात. कदाचित भरताचे नाट्यशास्त्र या लोकनाट्यकलांतील संगीत कलावंतानी स्वीकारले

असावे. याचे विशेष चिंतन होणे आवश्यक वाटते. कारण लोक - लोकबंध - लोक - लोकबंधाचे प्रकटीकरण - लोकसाहित्य - लोकसाहित्यप्रयोगातून - अभिजात निर्मितीस सामग्री - अभिजात किंवा शास्त्रीय निर्मिती - शास्त्रीय निर्मितीचा 'लोक'मध्ये प्रचार, वापर, सराव - लोकबंध - लोक - लोकबंधाचे प्रकटीकरण - लोकसाहित्य - असा हा लोकबंधापासून - लोकबंधापर्यंतचा प्रवास सनातनपणे परिवर्तनशीलतेने सुरू असतो; हे लक्षात घ्यावे लागते. लोकबंध नित्य वर्तमान स्वरूपात वावरण्याच्या स्वाभाविक प्रक्रियेत प्रकटतात.

विधीनाट्यांमधील आणि संस्कृतीउपासकांमधील पदन्यास, मुद्रा आणि हावभाव नर्तनाच्या स्वरूपात घडत असतात. खेळकऱ्यांच्या हालचालींच्या बाबतीतही असे म्हणता येईल. मात्र खेळकऱ्यांच्या हालचालींना विधीसामर्थ्य नसते हे लक्षात घेतले तरी त्यांच्याही हालचालींना पारंपरिकतेच्या दृष्टीने लोकबंधात्मकता असते.

ड) लोकबंधाच्या आविष्कारांचे लोकरंगभूमी म्हणून विचारात घेतलेल्या प्रत्येक स्तरावरील प्रयोगाचे प्रयोगमूल्य नाट्याविष्काराच्या दृष्टीने विचारात घेता येते. (१) कथा सादरीकरण : कथासादरीकरण करणारा कथक, श्रोते आणि कथावस्तू किंवा कथाद्रव्य या तीन घटकांचा विचार केला तर सादरीकरणाची रंगत साभिनय उत्कंठापूर्ण मांडणीवर अवलंबून असते. कथाप्रकारानुसार रंजनप्रधानता, ज्ञानसाधना आणि श्रद्धा या हेतुंसह श्रोता त्यात सहभागी होतो. म्हणजे सादरीकरणाचे 'श्रोतृ' अर्थात् प्रेक्षक-सापेक्ष सामर्थ्य, यावरच कथासादरीकरणाचे प्रयोगमूल्य ठरते. (२) क्रीडा उपासक : यांच्या स्तरावर जनावरांच्या रुपकांमधून रुपकात्मक पथनाट्यांचे आविष्कारण होते. एकेरी नाट्यछटेच्या तंत्राचा वापर खेळकरी करतो; आणि सूचक अभिनय जनावरांकडून करवितो. तसेच कसरतीचे प्रयोग चित्तथरारक पद्धतीने, प्रेक्षकसापेक्षतेने, खेळकरी करतात. रंजन, बोधन आणि आत्मपरीक्षण या पातळीवर प्रेक्षकांना सहभागी करून घेत, दक्षिणा दान मागत हे खेळ होतात. त्यामुळे खेळकऱ्यांच्या दृष्टीने 'प्रेक्षक' हा घटक सर्वार्थाने महत्त्वाचा असतो. नाट्याविष्काराच्या दृष्टीने प्रेक्षकसापेक्षतेच्या कसोटीवर या स्तराचे प्रयोगमूल्य ठरते. खेळकरी हा मागता, प्रबोधक व रंजन करणारा घटक या दृष्टीने कर्तव्यबुद्धीने लोकांकडून लोकबंधात्मकतेने, प्रयोगमूल्याच्या आधारे सांभाळला जातो. (३) सांस्कृतिक उपासकांचा वर्ग हा धर्मश्रद्धांचे उद्घाटन, भरण-पोषण करणारा लोकधारणात्मक घटक होय. हा स्तर लोकजीवनातील श्रद्धात्मक लोकबंधाच्या संवदनेने आपला आविष्कार घडवितो. यांच्या नाट्याविष्करणांत धर्मश्रद्धेच्या लोकबंधात जगणाऱ्या 'लोक'ची श्रद्धा जागविणे, त्यांचे भविष्य सांगणे, आशिर्वचन उद्गारणे असे भाग असतात. हे भाग प्रभावीपणे करण्यासाठी श्रद्धापूर्ण प्रेक्षक सापेक्ष स्वरूपात त्यांचे पारंपरिक आविष्करण सुरू असते. त्यांच्या प्रयोगात प्रेक्षक किंवा भोक्ता यजमान स्वरूपात थेट सहभागी असतो. त्यामुळे त्या नाट्याविष्काराचे मूल्य यथार्थतेच्या पातळीवर जाते. लेणी उदा. हळदकुंकू, इ. सह-घोषणात्मक आणि लयीतील संवादात्मकतेसह या उपासकांचे सादरीकरण सुरू असते. त्यामुळे कलानाट्याच्या परिणामाऐवजी लोकबंध प्रकटीकरणाचे परिमाण लावूनच या नाट्याविष्कारांचे प्रयोगमूल्य ठरते. हे नाट्याविष्कार अंगण, ओसरी, रस्ते, चौक अशा सहज उपलब्ध होतील अशा ठिकाणी तसेच जत्रायात्रांमध्ये, चावड्यांसमोर होत असतात. (४) विधीनाट्यांमध्ये पुरोहितांचा वर्ग आणि यजमान दोघेही किंवा दोन्ही गट पूर्णतः सहभागी होतात. मात्र, प्रत्यक्ष प्रयोगातील विधींची मांडणी आणि संपादणी आपल्या मंत्रसामर्थ्ययुक्त पारंपरिक, मौखिक आणि वस्तुरूप किंवा भौतिक परंपरांच्या उपयोजनाने पुरोहित करीत असतो. याशिवाय-गावकरी, सगेसोयरे, पाहुणेरावळे, हितचिंतक अशा निमंत्रितांचा वर्ग प्रेक्षक म्हणून आणि श्रद्धविधीची पाठराखण करण्यासाठी उपस्थित असतो. असे असले तरी पुरोहितांचा वर्ग आपली पारंपरिक आख्याने, कथागीते, उपाख्याने, कवने, आरत्या, गण, संपादण्या इ. गोष्टी जमलेल्या सर्वांना रंजनप्रधानतेने आणि संगीताच्या साथीने सादरीकरण करून ऐकवितात. मात्र श्रद्धा, धार्मिकता, कुलधर्मकुलाचार, सत्संग, व्रतपूर्तता किंवा साधना यांतच पुरोहित आणि भोक्ते प्रयोगसमयी भारावून गेलेले असतात. सादरीकरणातून भारलेपण येणे,

मानसिक समाधान लाभणे, कृतार्थता वाटणे यांवर प्रयोगमूल्य अवलंबून असते. धर्मकर्मकांडातील कर्मठपणाच्या ताणातून काही प्रमाणात मुक्तता, या दृष्टीने रंजकता आणलेली असते. मात्र प्रयोगात सहभागी पुरोहित आणि भोक्ता आपापली विधीविधानातील भूमिका श्रद्धापूर्वक वठवितो. कलगीतुरा यासारखे प्रकार संहितानिष्ठ असले तरी त्यांची लिखित बाडे केव्हा अस्तित्वात आली हे सांगता येत नाही. अन्यथा तीही लोकबंधात्मक मौखिक परंपराच आहे. या कलगीतुऱ्यांचे प्रयोग धर्मश्रद्धेसह होतात. यात मात्र सादरकर्ते आणि भोक्ते असे भेद करता येतात. भोक्त्यांमध्ये रंजनप्रधानतेने आणि कुतूहलाने ऐकणारा श्रोतृवर्गही असतो. अलिकडे कलतुऱ्यांचे सामनेही भरविले जातात. उदा. भिंगार (अहमदनगर, महाराष्ट्र) अर्थातच या प्रयोगांचे प्रयोगमूल्य बहुतांशी प्रेक्षकसापेक्ष ठरते. मंत्रतंत्र करणारे मांत्रिक किंवा यातुधान यांची विधीनाट्ये देखील पुरोहित (मांत्रिक-यातुधान) आणि भोक्ते या दोहोंच्या सहभागाने घडतात. विधीनाट्यांप्रमाणे यातुधान भोक्त्यांकडून विधीमार्ग करवून घेतो; किंवा त्याच्यावतीने करतो. सादरकर्ते, सादरीकरणातील विधीमार्ग मांडणी, कृती आणि भोक्ते या तीनही बावतीत लोकबंधात्मक नाट्याविष्कार घडतो. यात रंजकता नसते, ह्या नाट्यातून भोक्त्याचे समाधान होते; हेच प्रयोगमूल्य होय. हे सर्व तंत्र यथार्थतेच्या भूमिकेतून अर्थात् श्रद्धेच्या भूमिकेतून वापरले जाते. (५) जत्रायात्रांच्या स्वरूपात होणारी नाट्ये, प्रामुख्याने, रंजनाच्या दृष्टीने अधिक पुष्ट असतात. असे असले तरी त्यातील सर्व खेळांत, श्रद्धेचा लोकबंध, सादरकर्ते आणि प्रेक्षक किंवा भोक्ते यांच्या ठिकाणी घट्ट असतो. प्रयोगात कलात्मकता अधिकाधिक आणण्याचा प्रयत्न होतो. त्यादृष्टीने सुंबरान, बोहाडे, दशावतारी, खम, दंडार, विविध प्रकारची समूहनृत्ये ह्या प्रयोगांना प्रेक्षकसापेक्षतेचे मूल्य असते. या प्रयोगांमध्येही भोक्ते किंवा प्रेक्षक मुक्तपणे सहभागी होतात, आणि या प्रयोगांतील मौखिक-संहितांना प्रसंगानुरूप पुस्त्या-दुरुस्त्याही सुचवितात, मंत्रसामर्थ्यात्मक संहिता घटकांची आठवण करून देतात. कृषक्विधिविधानांमध्ये होणारी विधीनाट्ये मात्र धर्मश्रद्धायुक्त लोकबंधाचा थेट आविष्कार असतो. जन्मप्रथा, लग्नप्रथा, आणि मर्तिकप्रथा यांप्रसंगी होणाऱ्या लोकबंधात्मक नाट्याविष्कारांना जीवनसारणीतील भरणपोषणाचे मूल्य असते. याप्रसंगीचे विधीनाट्यात्मक प्रयोग- पुरोहितवर्ग, यजमानांच्या सहयोगाने सादर करतात. त्यात गोतावळा प्रेक्षकस्वरूपात सहभागी झालेला असतो. रंजनप्रधानताही असते आणि लोकधारणेचे सबलीकरणही त्यात असते. (६) लोकनाट्ये, तमाशा, गंमत या स्तरातील सर्व खेळ प्रेक्षकसापेक्षतेच्या मूल्याधारे घडतात. नागर अथवा अभिजात लोकरंगभूमीतील धर्मश्रद्धा लोकबंधाचे नगण्य अस्तित्व या लोकरंगभूमीवर आढळते. रंजन हेच प्रयोगाच्या सादरीकरणाचे मूल्य ठरते. हे मूल्य कलात्मकतेच्या कसोटीवर जोखले जाते. असे असले तरी, या खेळांचे उपयोजन सणोत्सव, जत्रायात्रा किंवा प्रबोधक चळवळींच्या निमित्ताने केले जाते; तेव्हा धर्मश्रद्धेचा लोकबंध, सादरकर्ते कलावंत आणि यजमानांसह प्रेक्षक, या सर्वांच्याठायी आविष्कृत होतो. लोकरंगभूमीच्या या स्तराचे प्रयोगमूल्य प्रेक्षकसापेक्ष





अनुक्रमणिका








असते; हे नक्की. (७) ब्राह्मण-पुरोहितांचा वर्ग, धार्मिक-विधिविधाने, विधिनाट्यांच्या स्वरुपात, यजमानांकडून करून घेतात किंवा त्यांचे प्रतिनिधी म्हणून स्वतः करतात. याप्रसंगीही गोतावळा जमलेला असतो. येथे रंजनात्मक गोष्टींना स्थान नगण्य असते. धर्मश्रद्धांचे भरणपोषण, कुलधर्म कुलाचारांचे साधनीकरण, या उद्देशाने हे लोकबंधात्मक नाट्याविष्कार घडत असतात. त्यांचे प्रयोगमूल्य हे मांडणी, विधिविधाने आणि सिद्धतेविषयीचे समाधान यावर अवलंबून असते.

**क) लोकबंधात्मक नाट्याविष्कारांची वैशिष्ट्ये:** (१) लोकबंधाचे नाट्याविष्कार, ज्या भूमीवर भोक्ते यजमान आणि प्रेक्षक यांच्यासह घडतात, त्या भूमीला (स्थळाला) मंचाचे स्वरूप प्राप्त झालेले असते. तीच लोकरंगभूमी होय. (२) लोकबंधाचे आविष्कार, कलात्मक आणि रंजनात्मक वाटले; तरी लोकजीवनसारणीच्या धारणाशक्तीचा तो अविभाज्य घटक असतो. त्यामुळे या आविष्कारांना जीवनसारणीपासून स्वतंत्र काढून केवळ कला म्हणून पाहता येत नाही. (३) लोकबंधाचे नाट्याविष्कार प्रेक्षक किंवा भोक्ते यांना प्रयोगात सामील करून घेऊनच घडत असतात. मुक्तनाट्याविष्कार असे त्यांचे स्वरूप असते. प्रेक्षकांच्या सहभागामुळे कलावरोध किंवा रसभंग झाल्याची भावना अजिबात निर्माण होत नाही; उलट प्रयोगातील संवेदनशील-भावात्मकता आणि रंगतही वाढत जाते. (४) लोकबंधांच्या नाट्याविष्कारात कलावंत किंवा सादरकर्ते, मौखिकपरंपरा, संगीत साधने, नृत्यपरंपरा, विधीविधाने आणि सहभागी भोक्ते प्रेक्षक या सर्वांना प्रयोगदृष्ट्या लोकबंधाचे मूल्य प्राप्त असते. त्या प्रयोगातून समग्र लोकमानसाचा आविष्कार घडत असतो. (५) लोकजीवनसारणीतील धर्म, नीती, तत्त्वज्ञान, विधीनिषेध याविषयीची सनातन श्रद्धा लोकबंधात्मकतेने या नाट्याविष्कारात आविष्कृत होते. त्यामुळे या नाट्याविष्कारांना कलामूल्याबरोबर मंत्रसामर्थ्यमूल्य प्राप्त झालेले असते. कलात्मकतेने आविष्कृत करण्याचा प्रयत्न, समूहमनातील सौंदर्यभावना आणि कलावंताच्या ठिकाणी असलेली प्रतिभा यामुळे हे मंत्रसामर्थ्य निर्माण होते. (६) लोकबंधात्मक नाट्याविष्कारातील भावात्मकता, कलात्मकता, मौखिक परंपरा, संगीत आविष्कारातील वाद्य आणि नृत्य परंपरा, तसेच गायन घराण्याची परंपरा, भौतिक सामग्री, विधीमार्गातील लोकबंधात्मक जाणीव, नाट्याविष्काराला असलेली लोकप्रतिष्ठा या सर्व गोष्टी अभिजात किंवा नागर रंगभूमीला सामुग्री पुरविणाऱ्या आहेत. (७) अभिजात रंगभूमी परंपरा घडत असताना, लोकबंधात्मक नाट्याविष्कारांची परंपरा, स्थलकालपरिस्थिती, परिवर्तनशीलता लोकबंध (लोकधारणासूत्र Folk Element / Folk Type) स्वरुपात अस्तित्वात असतेच.

येथवरच्या चर्चेवरून लोकबंधांचे नाट्याविष्कार हे लोकधारणेचे समग्र लोकमानसाचे स्पंदनात्मक आणि भरणपोषणात्मक आविष्कार आहेत तसेच त्यांचे नाट्यमूल्य जीवनसारणीशी निगडित आहे; हे लक्षात येईल.

**संदर्भ :**

१) लोकबंध : सहस्रबुद्धे अनिल, दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे, प्र. आ. १९९५ (पृ. ५१).
२) लोकसाहित्य एक स्वतंत्र अभ्यासक्षेत्र : मोरजे (डॉ.) गंगाधर, दास्ताने रामचंद्र आणि कंपनी, पुणे, आ. प. १९८५, 'लोकसाहित्याचे कलारूप', पृ. ९ ते २३.
३) तत्रैव.
४) लोकसाहित्यविचार : सहस्रबुद्धे अनिल, सविता प्रकाशन, औरंगाबाद, 'लोकसाहित्याचा कलात्मक आविष्कार', पृ. ४२ ते ४७, प्र. आ. १९९०.
५) लोकरंगकला आणि नागरभूमी : मांडे प्रभाकर (संपा.), सविता प्रकाशन, औरंगाबाद, आ. प. १९८९.
६) मराठी संशोधन पत्रिका : मराठी संशोधन मंडळ (संपा.), मराठी रंगभूमीचा विकासक्रम एक दिशा प्रा. डॉ. तारा फवाळकर, पृ. ३३ ते ४३.
७) पारंपरिक नाट्यरुप लोकोत्सव : देशमुख संजय, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद, आ. प. २००६.
८) मराठी लोककथागीत : कुलकर्णी दिनकर, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती १९९८.

**प्राचार्य डॉ. अनिल नागेश सहस्रबुद्धे**
'आई', समर्थनगर, श्रीराम चौक, पाईपलाईन रोड,
अहमदनगर ४१४००३, भ्रमणभाष - ९८८१५००९४२

# मराठी व्याकरण : इंग्रजी नव्हे पंडिती !

प्रा. सौ. मालती हळवे

*[ मराठी व्याकरणव्यवस्थेवर इंग्रजी भाषेचा प्रभाव असल्याच्या संकल्पनेचा फेरविचार करणारा हा लेख अभ्यासकांच्या विचारार्थ प्रसिद्ध केला आहे. मराठी व्याकरण हे पाणिनीच्या अष्टाध्यायीवर अवलंबून आहे. ते संस्कृतोद्‌भव आहे; याचे हे एक विवेचन आहे. मराठी व्याकरण : इंग्रजी की पंडिती ह्या प्रश्नाचे उत्तर शोधणारा हा लेख– इंग्रजी नव्हे पंडिती ! मननीय आहे. – संपादक ]*

व्याकरण हा शब्द आम्हा भारतीयांना नवा नाही. आमचे चार वेद, ब्राह्मण्ये, आरण्यके अशा श्रौत वाङ्‌मयाचा अभ्यास करण्यासाठी सहा वेदांगे जन्माला आली होती, ती अशी : शिक्षा, कल्प, निरुक्त, व्याकरण, छंदस् व ज्योतिष. असे हे व्याकरण शब्दरूपांना जन्म देण्यासाठी व शब्दरूपांच्या विविध अर्थच्छटा स्पष्ट करण्यासाठी जन्माला आलेले आहे. व्याकरण हा शब्द वि + आ + कृ = स्पष्ट करणे या धातूवरून निर्माण झालेला आहे. व्याकरण शब्दांची केवळ विविध रूपेच तयार करते असे नव्हे; तर त्या त्या भाषिक लोकांच्या लेखनात, बोलण्यात एकवाक्यता व शुद्धता आणते, एकात्मता साधते आणि एका भाषेच्या अभ्यासातून अनेक भाषाशिक्षणाचा मार्ग मोकळा व सुकर करते.

अशा या भाषेचा आत्मा असलेल्या व्याकरणाची इंग्रजी वाटचाल आपण पाहूया :

इ. स. पूर्व चौथ्या शतकात प्लेटो नावाचा एक ग्रीक तत्त्ववेत्ता होऊन गेला. भाषा हे तत्त्वज्ञानाच्या अभिव्यक्तीचे पहिले साधन आहे. त्यामुळे तत्त्ववेत्ते भाषेचाही थोडाफार अभ्यास करतात असे आजवर बऱ्याच वेळा दिसून आलेले आहे. प्लेटोने नाम व विधेय असे भाषेचे दोन घटक शोधलेले होते. नाम व विधेय यांमध्ये भाषिक भेद व अंतर्गत संबंध असतो, असे त्याने प्रतिपादिले होते. प्लेटोची भाषिक मते 'क्रेटिलस', 'थिपेटिटस' व 'सोफिस्ट' या संवादात प्रसिद्ध झालेली आहेत. विधानाची सत्यासत्यता नाम व विधेय या दोन घटकांवर अवलंबून असते असे प्लेटोचे प्रांजळ मत होते.

ॲरिस्टॉटल हा प्लेटोचा शिष्य. त्याने प्लेटोचे हे दोन घटक मान्य केले होते. त्याच्या 'पोएटिक्स' या ग्रंथात त्याने व्याकरणात्मक घटक पुढीलप्रमाणे दिलेले आहेत : नाम, क्रियापद, उपपद, लिंग व काल. जे. के. हल (ज्युनियर) त्याच्या Introductory Linguistics या पुस्तकातील Linguistics, Philosophy and Psychology या धड्यात ६८व्या पृष्ठावर म्हणतो : Beginning with Aristotle, it was customary to establish three main 'categories of predication' things or substances, qualities and actions. ग्रीक भाषेत जे भाषाविषयक दोन घटक मानले जात असत, त्यांमध्ये विशेषण या तिसऱ्या घटकाची ॲरिस्टॉटलने भर घातली आहे. या गटाला नियमवादी गट म्हणतात.

त्यानंतर स्टोइक व्याकरणकारांचा 'अनियमवादी' गट पुढे आला. त्यांनी भाषेच्या सार्थ घटकांची उपपत्ती सांगताना तीन गोष्टी मानल्या : (१) चिन्ह-ध्वनी, (२) उच्चारण-अर्थ, (३) वस्तू वा घटना. यातील १ व ३ या भौतिक असून त्यांना अस्तित्व आहे. अर्थाला त्या प्रकारचे अस्तित्व नाही. आपल्या विचारात वावरणारी व तर्कशुद्धतेने निश्चित केलेली ती एक वस्तू आहे (subsiten thing). म्हणूनच संबंधित क्षेत्रातील अशिक्षित माणसाला अर्थ समजत नाही. हे सांगण्याचे कारण असे, की अर्थ हा नैसर्गिक मानला तर अशिक्षित व सुशिक्षित, असंस्कृत व सुसंस्कृत सर्वच माणसांना सारखाच समजेल असे मान्य करावे लागेल. अर्थ प्रतिबिंबात्मक असतो. त्याचा संबंध तार्किक प्रक्रियेशी जोडला जातो. त्यामुळे शब्दाचा अर्थ नैसर्गिक नसतो; शब्दप्रक्रिया त्यातील सर्व नियम, अपवादसुद्धा एक स्वतंत्र वस्तू बनते. याच विचारसरणीला स्टोइक तत्त्वज्ञांची अनियमवादी विचारसरणी म्हणून ओळखले जाते.

त्यानंतर इ. स. पूर्व पहिल्या शतकात डायोनिसिपस थ्राक्स नावाचा एक व्याकरणकार होऊन गेला. त्याने २५ छोट्या परिच्छेदांत ग्रीक भाषेचे व्याकरण लिहिले आहे.



अनुक्रमणिका

त्याने घटकांचे रूप व त्यांची संरचना यांना महत्त्वाचे स्थान दिले आहे. या व्याकरणात शब्द आठ प्रकारचे मानले जातात. मात्र प्रत्यक्षात सातच जाती दिलेल्या आहेत. त्या अशा : नाम, सर्वनाम, क्रियापद, कृदन्त, उपसर्ग, उभयान्वयी अव्यय व उपपद. आपल्या शब्दजाती अशा आहेत : नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापद, क्रियाविशेषण, उभयान्वयी अव्यय, शब्दयोगी अव्यय, केवलप्रयोगी अव्यय.

थ्राक्स यांनी भाषिक घटक त्यांच्या रुपात्मक भेदावरून ठरविले आणि मग त्यांचा अर्थ प्रतिरूप अर्थाशी लावला. याचा अर्थ असा, की रूपनिष्ठ अभ्यासावरच थ्राक्स यांनी भर दिला होता. या व्याकरणात syntax हा शब्द आलेला आहे. मात्र त्यात त्याविषयीची चर्चा आढळत नाही. लोक मात्र व्याकरणाचा अभ्यास या ग्रीक व्याकरणावरूनच करीत असत. ग्रीक व रोमन भाषा पुष्कळशा प्रमाणात सारख्याच होत्या. ग्रीक भाषेतील प्रवर्ग बऱ्याचशा प्रमाणात लॅटिन प्रवर्गाला लागू पडत होते.

यानंतर इसवीसनच्या पाचव्या शतकात प्रिसिअन नावाचा एक लॅटिन व्याकरणकार होऊन गेला. त्याने एकूण अठरा भागांत एक व्याकरण लिहिले आहे. त्यातील पहिल्या सोळा भागांत त्याने पदिम व उरलेल्या दोन भागांत वाक्यविचार केला आहे. हीच स्थिती अठराव्या शतकापर्यंत कायम होती. अठराव्या शतकात प्रसिद्ध झालेली पुढील इंग्रजी व्याकरणे पाहा :

**व्याकरणकार - व्याकरणाचे नाव व सन**

1. Charles Gildon and John Brightland - A Grammar of the English Language (1711)
2. Joseph Priestley - The Rudiments of English Grammar (1761)
3. Robert Lowth - A Short Introduction to English Grammar (1762)
4. John Ash - Grammatical Institutes (4th Edition) (1763)
5. Lindley Murray - English Grammar (1795)

ही सर्व व्याकरणे अठराव्या शतकात प्रसिद्ध झालेली आहेत. अठराव्या शतकात आणखी २२० संशोधनपर प्रबंध प्रसिद्ध झालेले होते. मात्र वरील पाचच व्याकरणे त्या काळात फार महत्त्वाची मानलेली होती. ही सर्व व्याकरणे लॅटिनवरून व पर्यायाने ग्रीक व्याकरणावरून लिहिली गेली आहेत. एकोणिसाव्या शतकात हीच पाच व्याकरणे थोड्याफार सुधारणा करून वापरली जात होती. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात देखील हीच स्थिती होती. विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात शिकणारा रोनाल्ड लँगाकर त्याच्या Language and its structure या पुस्तकात पृष्ठ ७वर लिहितो : Many of us can remember learning in school to conjugate English verbs according to paradigmatic scheme, suited to Latin and not to English. To find out why a six-form display was adopted for English, One has to look at Latin where six-form display is proper.

Six-form display of the verb, praise :

| Latin | English |
|---|---|
| 1. laudo | I praise |
| 2. laudas | You praise |
| 3. laudat | He, She, It praises |
| 4. laudamas | We praise |
| 5. laudatis | You praise |
| 6. laudant | They praise |

प्लेटोचे नाम व विधेय यांची सांगड घालणारी ही पद्धती आहे. त्याच पुस्तकात पृष्ठ ६वर लँगाकर म्हणतो, की लॅटिन व्याकरणात शब्दांच्या फक्त तीनच जाती दिलेल्या होत्या : नाम, क्रियापद व उभयान्वयी अव्यय.

रेन अँड मार्टिनचे इंग्लिश विषयावरील High-School English Grammar माझ्याकडे आहे. त्याचे कॉपीराइट १९३६ सालचे आहे. त्यापूर्वी प्रसिद्ध झालेले एकही इंग्रजी व्याकरण मला मिळालेले नाही.

आता मी मराठी व्याकरणाकडे वळते. आपल्या मराठी भाषेच्या व्याकरणाची सुरुवात १८२४ साली झालेली आहे. त्याचे नाव 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण'. जे व्याकरण जगन्नाथशास्त्री क्रमवंत, बाळशास्त्री घगवे व गंगाधरशास्त्री फडके या तीन पंडितांनी लिहिलेले आहे. हे पहिले मराठीचे व्याकरण संवादरूप होते. पुढे

गंगाधरशास्त्री फडके यांनी पहिल्या व्याकरणातील दोष बाजूला करून व योग्य ते स्वीकारून १८३६ साली 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' हे पुस्तक लिहिले.

या व्याकरणाच्या प्रस्तावनेत गंगाधरशास्त्री फडके लिहितात : 'सन १८२४ सालापर्यंत 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' असा शब्ददेखील नव्हता. असे असता हा महाराष्ट्र देश जेव्हा कंपनी सरकारच्या ताब्यात आला, तेव्हा या देशातील सर्व लोक विद्वान करावे या बुद्धीने उदार सरकारने शाळा घालण्याचे काम चालविले. त्यात प्रथम मुंबईत १८२२ साली मराठी शाळा सुरू केली. शाळेचे सोयीसाठी मेहर्बान कार्नेल जॉर्ज जारविस झाले. त्यांनी त्या कारखान्यात नवीन ग्रंथ इत्यादि कामे व्हावी म्हणून मजसुद्धा तीन पंडित ठेविले. त्यावरून संस्कृत व्याकरणाध्ययन वले करून एका वर्षात व्याकरण तयार केले. परंतु ते केवळ बरोबर झाले नाही. तथापि राहिले विषयात सूचक झाले. ह्याच व्याकरणावरून १८२५ पासून १८३६ सालपर्यंत शिकविण्याचे काम चालले.'.

पहिले १८२४ सालचे व्याकरण केवळ संवादरूप होते. त्यामुळे १८३६ साली गंगाधरशास्त्री फडके यांनी लिहिलेले गद्यरूप व्याकरण हेच मराठी भाषेचे पहिले व्याकरण आहे, असे अ. का. प्रियोळकर म्हणतात. (मी १८५० सालची प्रत पाहिली.)

गंगाधरशास्त्री फडके यांचे 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' संपूर्णपणे पंडितीय व्याकरण आहे. त्यांनी व्याकरणाचे चार भाग केले आहेत : १) वर्णविचार, २) संधिविचार, ३) शब्दसिद्धी, ४) वाक्ययोजना.

**१) वर्णविचार :** यामध्ये फडके यांनी मराठीची वर्णमाला दिली आहे. ते वर्णाचे दोन प्रकार- स्वर व व्यंजने-देतात. त्यानंतर ते ऱ्हस्व व दीर्घ व संधिस्वर असे वर्णांचे भेद देतात. स्वर व व्यंजनांच्या व्याख्याही ते देतात.

**२) संधिविचार :** या विभागात फडके प्रथम संधिनियम सांगतात व मग त्यांची उदाहरणे देतात. उदा. अ) दधि + ओदन = दध्योदन, ब) गळू + आत = गळवात.

**३) शब्दसिद्धी :** यामध्ये श्री. फडके यांनी शब्दांच्या आठ जाती सांगितलेल्या आहेत. इंग्रजी व्याकरणात या शब्दजाती नाहीत. मराठीतच या शब्दांच्या जाती श्री. फडके यांनी दिलेल्या आहेत. संस्कृत व्याकरणाच्या अत्यंत सखोल अभ्यास करणाऱ्या गंगाधरशास्त्री यांनी या आठ जाती शोधून काढल्या. संस्कृतमध्ये फक्त तीनच गट दिलेले आहेत : अ) नामिक गट, ब) धातुगट, क) अव्यय गट. नामिक गटात १) नाम, २) सर्वनाम आणि ३) विशेषण अशा तीन जातींचा समावेश होतो. धातुगटात धातू असतात. अव्यय गटात उभयान्वयी, क्रियाविशेषण, शब्दयोगी व केवलप्रयोगी अशी चार अव्यये असतात. श्री. गंगाधरशास्त्री यांनी या तीन गटांतून शब्दांच्या आठ जाती तयार केल्या. शब्दांच्या आठ जाती ही मराठीने जगाला दिलेली मोठी देणगी आहे. या आठ जातींच्या व्याख्याही गंगाधरशास्त्री करतात, त्या अशा :

१) नाम : नाम म्हणजे प्रत्येक पदार्थाचे नाव. जसे, मनुष्य, पोथी, लेखणी. यामध्ये श्री. फडके नामांचे प्रकार देतात.

२) सर्वनाम : जो शब्द प्रयोगात नाम आणि विशेषण या ठिकाणी लाघवार्थ किंवा संकेतार्थ म्हणून योजितात त्यास सर्वनाम म्हणावे. येथे गंगाधरशास्त्री सर्वनामाचे पाच प्रकार देतात : दर्शक, संबधी, पुरुषवाचक, प्रश्नार्थक व सामान्य सर्वनाम.

३) विशेषण : पदार्थाचा गुण किंवा इतर शब्दांशी भेद दाखविणारे जे शब्द, त्यांस विशेषण असे म्हणतात. उदा. पांढरा, एक, दुसरा. प्रकार : गुणविशेषण, संख्याविशेषण.

४) क्रियापद : धातूस प्रत्यय लागून जे रूप सिद्ध होते ते रूप.

५) क्रियाविशेषण : म्हणजे क्रियेवर विशेष परिणाम दाखविणारे जे ते होय.

६) उभयान्वयी अव्यय : उभयान्वयी अव्यय जे तेच होय की जे दोन शब्द किंवा वाक्यांस परस्पर जोडते.

७) शब्दयोगी अव्यय : म्हणजे ज्याचा प्रयोग शब्दयोगावाचून होत नाही. जसे, ओटीवरती, धेनूपुढे.

८) केवलप्रयोगी अव्यय : तेच होय ज्याचा इतर शब्दनिरपेक्ष प्रयोग होतो. उदा. हां, अहाहा, अरेरे.

**४) वाक्ययोजना :** ह्या विभागात गंगाधरशास्त्री कर्तरि, कर्मणि, भावि अशा वाक्यरचना देतात. शिवाय कारकार्थ देतात.



अनुक्रमणिका

कै. गंगाधरशास्त्री फडके यांचे हे व्याकरण म्हणजे जगाला मार्ग दाखविणारा दीपस्तंभ आहे. हे पाणिनीय व्याकरणावर आधारित व्याकरण आहे. या व्याकरणात फडके यांनी प्रमुख तीन काळ - वर्तमान, भूत, भविष्य- यांचा विचार केला आहे आणि त्यांच्या उपप्रकारांचाही विचार केला आहे.

मराठीचे आद्य व्याकरणकार म्हणून गौरविलेले दादोबा पांडुरंग तर्खडकर यांचे १८३६ साली प्रसिद्ध झालेले 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' काही मला वाचायला मिळाले नाही. मात्र त्याच्या १८५० साली प्रसिद्ध झालेल्या मोठ्या व्याकरणाची एक प्रत मला मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, नायगाव येथे पाहायला मिळाली. त्याच व्याकरणाच्या पाच लघुआवृत्त्यांतील प्रती (१८६५, १८८२, १९०३, १९०४, १९३१) मला तेथेच वाचायला मिळाल्या. त्यावरून माझी खात्रीच पटली, की ते व्याकरण संस्कृतोद्भवच आहे.

स्वतः दादोबा पांडुरंग संस्कृत शिकलेले नव्हते. त्यांना प्राकृत भाषेचे ज्ञानही नव्हते. अशी स्पष्ट कबुली ते स्वतः आपल्या आत्मचरित्रात देतात. पुढे बापूशास्त्री शुक्ल यांनी त्यांना मराठी व्याकरण शिकविले असे ते म्हणतात. मात्र ज्या दादोबांना संस्कृत भाषेचे ज्ञान नाही ते दादोबा संस्कृतची वर्णमाला, तिच्यातील वर्णभेद, उच्चारस्थाने काहीच सांगू शकणार नाहीत. संधिविचारात तर्खडकर अच् संधी व हल्संधी सांगतात. शब्दांच्या आठ जाती सांगतात. वाक्ययोजना सांगतात. संस्कृतचे ज्ञान नसणारा हे सांगू शकत नाही. प्राकृत भाषेचे त्यांना ज्ञान नाही. त्यामुळे ते काळ व त्याचे उपप्रकार सांगू शकणार नाहीत. ज्या 'लिंडले मरे'च्या व्याकरणाचा उल्लेख दादोबा करतात, ते १७९५ साली प्रसिद्ध झालेले लॅटिनवरून लिहिलेले इंग्रजी व्याकरण आहे. त्यात शब्दांच्या आठ जाती, वर्णविचार, संधिनियम, शब्दसिद्धी व वाक्ययोजना निश्चितच नाहीत. Guy's Grammar मध्येही त्या नाहीतच.

दादोबा पांडुरंग त्यांच्या ग्रंथाची संदर्भसूची देत नाहीत. त्या वेळी प्रचलित असलेल्या बाळशास्त्री जांभेकर, गंगाधरशास्त्री फडके, इक्बाल महमंद, स्टीव्हन्सन वगैरे व्याकरणांचा उल्लेख ते टाळतात. एवढेच नव्हे, तर त्यांनी 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' हे आपल्या व्याकरणाला नाव का दिले, त्याचेही कारण ते विदित करीत नाहीत. गंगाधरशास्त्री फडके यांच्या व्याकरणाचे नाव 'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण' व दादोबांच्या व्याकरणाचे नावही तेच, हा काही योगायोग नाही हे निश्चितच. मी येथे एवढेच सांगू इच्छिते, की दादोबांचे व्याकरण हे पूर्णपणे संस्कृत व्याकरणावर आधारित आहे. एखादा सराईत योद्धा रणभूमीवर ज्या सहजपणे वावरतो व एकेका शत्रूचा नाश करतो तसेच दादोबा पांडुरंग एखाद्या पंडिताप्रमाणे व्याकरणातील प्रवर्ग सपासप् मोकळे करतात. तेव्हा मला येथे स्पष्टपणे नमूद करावयाचे आहे, की दादोबा पांडुरंग यांचे व्याकरण पूर्णपणे संस्कृतोद्भवच आहे. त्यात इंग्रजी व्याकरणाचा कोणताही प्रवाह नाही.

दादोबा पांडुरंग तर्खडकर यांचे व्याकरण संस्कृतोद्भव आहे याला आणखीही एक पुरावा आहे. १८८५ साली दादोबा यांच्या व्याकरणाची पुनरावृत्ती काढण्याची वेळ आली. त्या वेळी त्या वेळच्या मुंबई इलाख्याच्या विद्याखात्याचे डायरेक्टर मेहर्बान चाटफिल्ड साहेब यांनी सद्यःस्थितीला अनुसरून त्या व्याकरणात बदल करण्यात यावेत असे दादोबास सुचविले. दादोबांनी ते काम पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य रावजी सदाशिवशास्त्री गोडबोले यांच्यावर सोपविले. गोडबोले यांनी त्यांच्याच कॉलेजातील प्राध्यापक रा. रा. नारायणशास्त्री साठे व धुळ्याच्या ट्रेनिंग कॉलेजातील प्राध्यापक रा. रा. नारायण धोंडदेव जोशी यांच्यासह ते काम करण्याचे ठरविले. मात्र १८९१ साली त्यांचा मृत्यू झाला. त्यानंतर ते काम नारायणशास्त्री साठे, नारायणशास्त्री जोशी यांनी पूर्ण केले व १८९७ साली रत्नागिरी येथे 'बकुल' प्रेसमध्ये छापून तयार केले.

१) येथे प्रश्न असा उद्भवतो, की जर दादोबा पांडुरंग यांचे व्याकरण इंग्रजीवर आधारित होते तर स्वतः दादोबांनीच लिंडले-मरेचे ग्रामर व गाईजचे ग्रामर अशी दोन्ही व्याकरणे रावजीशास्त्री गोडबोले यांना उपलब्ध करून दिली असती.

२) ते व्याकरण संस्कृतोद्भव नव्हते तर मग शास्त्री किंवा पंडितांनी त्याची पुनरावृत्ती कशी काढली असती ?

३) नारायणशास्त्री साठे व नारायणशास्त्री जोशी हे पंडित होते. त्यांनी संस्कृतच्या आधारेच नवीन व्याकरण लिहिले.



अनुक्रमणिका

यावरून असे दिसते, की दादोवा यांचे व्याकरण संस्कृतोद्‌भवच आहे.

डायोनिसिपस थ्राक्स व गंगाधरशास्त्री फडके यांनी दिलेल्या शब्दजातींमध्ये फरक आहे हे आपण पाहूया

डायोनिसिपस थ्राक्स-शब्दजाती : १) नाम व सर्वनाम ३) क्रियापद ४) कृदन्त ५) उपपद ६) उपसर्ग ७) उभयान्वयी अव्यय.

गंगाधरशास्त्री पडके-शब्दजाती १) नाम २) सर्वनाम ३) विशेषण ४) क्रियापद ५) क्रियाविशेषण अव्यय ६) शब्दयोगी अव्यय ७) उभयान्वयी अव्यय ८) केवलप्रयोगी अव्यय.

**तुलनात्मक निष्कर्ष :**

१) वरील जाती पाहिल्या, की आपल्या लक्षात येते, की ग्रीक लोकांच्या शब्दजाती व गंगाधरशास्त्री फडके यांच्या शब्दजातींत पुढील जाती समान आहेत- १) नाम २) सर्वनाम ३) क्रियापद ४) उभयान्वयी अव्यय.

२) ग्रीक लोकांना विशेषण, शब्दयोगी अव्यय, क्रियाविशेषण अव्यय व केवलप्रयोगी अव्यय या चार शब्दजाती माहीत नाहीत.

३) कृदन्त, उपपद, उपसर्ग यांना गंगाधरशास्त्री फडके शब्दजाती मानीत नाहीत. कृदन्ते ही क्रियापदांपासून प्रत्यय लावून बनतात. उपसर्ग हे क्रियापदाच्या पूर्वी लागतात व उपपद ही शब्दजाती ही फक्त इंग्रजीतच आहे.

४) वरील चर्चेवरून हे लक्षात येते, की गंगाधरशास्त्री फडके यांच्या शब्दजाती या ग्रीकांच्या शब्दजातींपेक्षा वेगळ्या आहेत.

५) गंगाधरशास्त्री फडके यांनी दिलेल्या शब्दजाती या सर्व जगाच्या व्याकरणाला त्यांनी दिलेली देणगी आहे. बुद्धिमत्तेचा तो परमोत्कर्ष आहे.

६) फडके यांनी पाणिनीय व्याकरणातील अव्यय गट फोडून ज्या चार शब्दजाती तयार केल्या त्यांना जगात तोड नाही.

७) या शब्दजातींवरून असा निष्कर्ष काढता येतो, की ग्रीकांकडून आमच्या मराठी व्याकरणात कोणता प्रवाह आलेला नाही.

८) ग्रीकांच्या व्याकरणावरच लॅटिन व्याकरण आधारित आहे आणि लॅटिन व्याकरणावर इंग्रजी व्याकरण आधारित आहे. तेव्हा इंग्रजी व्याकरणातून कोणताही प्रवाह मराठी व्याकरणात आलेला नाही हे मी सांगू इच्छिते.

त्यानंतर मी मोरेश्वर केशव दामले यांचे शास्त्रीय मराठी व्याकरण वाचले. त्याची संदर्भसूची पाहिली. त्यामध्ये एकही इंग्रजी व्याकरण नाही.

**संदर्भसूची :**


१) महाराष्ट्र भाषेचे व्याकरण, दादोवा पांडुरंग तर्खडकर

२) महाराष्ट्र भाषेचे व्याकरण, दादोवा पांडुरंग तर्खडकर

३) मराठी व्याकरणावर निबंध, कृष्णशास्त्री चिपळूणकर

४) मराठी भाषेचे नवीन व्याकरण, कृष्णशास्त्री गोडबोले

५) The Student's Marathi Grammar, Ganpatrao Navalkar

६) वाक्यमीमांसा व वाक्यांचे पृथक्करण, गोपाळ गणेश आगरकर

७) प्रौढबोध व्याकरण, रामचंद्र भिकाजी जोशी

८) संकलित लेख, रामचंद्र भिकाजी गुंजीकर

९) A Higher Marathi Grammar, Appaji Kashinath Khare

१०) मराठी भाषेचे मध्यम व्याकरण, रावजी सदाशिव गोडबोले

११) श्री ज्ञानेश्वरीतील मराठी व्याकरण, विश्वनाथ काशीनाथ राजवाडे


यानंतर मी कै. मो. स. मोने यांचे 'मराठी व्याकरण' पाहिले. तेही पाणिनीय व्याकरणावरच अवलंबून आहे. कै. मो. रा. वाळंबे यांचे 'सुगम मराठी व्याकरणलेखन', 'मराठी शुद्धलेखन प्रदीप' ही दोन्ही व्याकरणे मी वाचली. त्यामध्ये कोठेही इंग्रजी व्याकरण वापरल्याचा उल्लेख नाही. तेव्हा आपले मराठी व्याकरण हे संस्कृतोद्‌भव किंवा पंडिती व्याकरणच आहे याबद्दल शंका नाही.

❖❖❖


**प्रा. सौ. मालती हळवे**

२०, सुयश, बांद्रा रेक्लमेशन.

बांद्रा, मुंबई - ४०० ०५०.

दूरभाष : २६४३१६०६





अनुक्रमणिका

# बोलीच्या 'अभ्यासा'विषयी–

पद्मश्री डॉ. यू. म. पठाण

*[ महाराष्ट्र साहित्य पत्रिकेने मराठी–बोलीच्या अभ्यासाकडे विशेष लक्ष वेधून घेण्यासाठी आतापर्यंत सुमारे दहा अभ्यासकांचे लेख प्रकाशित केले आहेत. ह्या अभ्यासाचे परीक्षण आणि आवश्यक तेथे पुनरीक्षण–पुनर्लेखन होऊन अधिकाधिक शास्त्रशुद्ध दिशा मिळावी ह्या तळमळीने, मराठी भाषेचे ज्येष्ठ अभ्यासक पद्मश्री डॉ. यू. म. पठाण सरांनी आपली प्रतिक्रिया मार्गदर्शनार्थ पाठविली आहे. – संपादक, म.सा. पत्रिका ]*

मार्च २००९ पासून 'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'नं मराठी भाषेच्या विविध बोलींविषयीचे लेख प्रकाशित करण्यास प्रारंभ केला, हे पाहून ज्यानं किमान अर्ध शतक भाषाविज्ञानाचं अध्ययन, अध्यापन संशोधन केलं, अशा माझ्यासारख्या अभ्यासकाला आनंद वाटणं स्वाभाविक आहे. म. सा. पत्रिकेसारख्या दर्जेदार वाङ्मयीन नियतकालिकानं या अध्ययन-संशोधन क्षेत्राकडे लक्ष वेधलं, हीही स्वागतार्ह बाव. त्याबद्दल मी संपादकांचं नि संपादक-मंडळाचं मनःपूर्वक अभिनंदन करतो. त्याचप्रमाणं ज्यांनी हे लेख लिहिले, किंवा ज्यांना ते लिहावेसे वाटले, त्याबद्दलही त्यांना धन्यवाद देतो. धन्यवाद याहीसाठी की, गेल्या अनेक दशकांत मराठीच्या अनेक प्राध्यापकांच्या मनांत भाषाविज्ञानाच्या आकलन-अध्यापनाच्या व संशोधनाच्या संदर्भात गोंधळ उडाल्याचं मला सातत्यानं जाणवू लागलं आहे. हा 'व्हायरस' संशोधनक्षेत्रातही शिरत असल्याची शंका येते. भाषा-विज्ञानाची काही चर्चासत्रं/शिबिरं होतात, त्यांच्या फलितांचं परीक्षण-निरीक्षण-चिंतन मनन नि त्यानंतर 'अनुदिनी अनुताप' करायला हवा की काय, असंही वाटू लागलं आहे. असं वाटणं हे कुणाच्याही अधिक्षेपासाठी नाही तर या महत्त्वाच्या आंतरराष्ट्रीय अध्ययनक्षेत्राच्या जपणुकीसाठी; त्याचप्रमाणं मराठी भाषेच्या शिस्तबद्ध अभ्यासासाठी. माझी या लेखामागील कळकळीच्या अभ्यासकाची भूमिका लक्षात घ्यावी.

डेक्कन कॉलेजसारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या संस्थेनं काही बोलींचा अभ्यास केला. तो (प्रत्येक बोलीचा) अभ्यास कसा व किती वर्षं केला व त्यातील फलिताचं प्रतिपादन कसं केलं. त्याचप्रमाणं ग्रीयर्सननं ते शतकापूर्वी कसं नि किती वर्षं केलं, डॉ. सुमंत मंगेश कत्रे यांनी Formation of Konkani चा अभ्यास कसा/कोणत्या पद्धतीनं केला, याचा थोडा जरी आलेख आपल्या मनात असेल, तर मराठीच्या सध्या अस्तित्वात असलेल्या व काही अस्तंगत होत चाललेल्या बोलींचा शास्त्रशुद्ध अभ्यास करण्याची व त्यांची वैशिष्ट्यं नोंदविण्याची निकड आजच्या एवढी कधीच नव्हती, असं जाणवल्यावाचून राहात नाही. त्यामुळं या संदर्भात महाराष्ट्राच्या विविध विभागांतील बोलींविषयी जी जी माहिती उपलब्ध/ज्ञात आहे; ती लेखबद्ध झाली तरी भावी अभ्यासक/संशोधकांना उपयुक्तच ठरणार आहे. म. सा. पत्रिकेतील बोलींविषयीचे हे लेख साधन-लेख (Source-Papers) म्हणू जरूर संग्राह्य आहेत, हे मी 'पत्रिके'तील गेल्या वर्षभराचे लेख वाचल्यानंतर सांगत आहे. त्यावरून या लेखकांजवळ त्या-त्या बोलीविषयी असलेली सामग्री, तिची त्यांनी केलेली मांडणी, त्यांची वर्गीकरणं/विश्लेषण/विवेचनपद्धती व त्यांना त्या बोलीच्या व्यवच्छेदकत्वाचं व प्रमाण मराठीशी असलेल्या साम्य-स्थळांचं आकलन-अशा अनेक गोष्टींची मला कल्पना आली. या विवेचनाला बोलीशास्त्राच्या (Dialectology) अध्ययनाचं किती अधिष्ठान आहे, याचा काहीसा अंदाज आला. खरं तर यांतील अनेक लेखांचा मला सविस्तर विचार करायचा होता; व तो सवडीअंती मी करणारच आहे; पण इथं case-study म्हणून केवळ एका बोलीविषयीच्या-माणदेशी बोलींविषयीच्या-लेखाविषयीचा विचार करीत आहे. हा विचार भाषावैज्ञानिक विवेचन-पद्धतीपुरताच मर्यादित आहे. माणदेशी बोलीची भौगोलिक, सांस्कृतिक, वाङ्मयीन पार्श्वभूमी डॉ. मोकाशी यांनी चांगल्या प्रकारे विशद केली आहे. त्या परिसरातील तिन्ही जिल्ह्यांशी (सातारा, सांगली, सोलापूर) माझाही संबंध आला आहे. सातारा, आटपाडी, खटाव, जत, मंगळवेढा, सांगोला, पंढरपूर, म्हसवड यांचा या संदर्भात उल्लेख करता येईल. डॉ. मोकाशी हे विवेचन करताना

केवळ तद्‌विषयक प्रकाशित साहित्यावर का विसंबून राहिले ते कळत नाही; त्यामुळे ते म्हणतात त्या 'लिखित साहित्याच्या मर्यादा' त्यांनी स्वतःच घालून घेतल्या आहेत. अशा साहित्यात भाषावैज्ञानिक पद्धतीनंच लेखन लेखक करतील, अशी अपेक्षा करणं प्रस्तुत ठरणार नाही. भाषावैज्ञानिक पद्धतीत मात्र डॉ. मोकाशींनी उल्लेखिलेल्या भाषिक (वा ध्वनिवैज्ञानिक) नोंदी निश्चितपणे करता येतात. त्यासाठी स्वतःच प्रत्यक्ष सर्वेक्षण करावं लागतं. हे प्रश्नावलीच्या साहाय्यानं करता येतं, हे सर्वज्ञात आहे. I.P.S. (International Phonetic Script ) चं निर्मिती प्रयोजन यातच शोधता येतं. या प्रकारे हवी ती भाषिक सामग्री मिळविता येते व वैशिष्ट्यं नोंदविता येतात. भाषावैज्ञानिक संशोधनातला हा पहिला व महत्त्वाचा टप्पा आहे, हे काही मी नव्यानं सांगत नाही. बोली किंवा भाषा काय, त्यांचं मूल स्वरूप लिखित नसून मौखिकच असतं, त्यामुळं ध्वनिविज्ञानाचा (Phonology) आधार अशा अध्ययन/संशोधनास केवळ उपयुक्तच होत नसतो; तर अपरिहार्यही असतो. अशाप्रकारे काळजीपूर्वक मिळविलेल्या सामग्रीचं व्यवस्थापन, विश्लेषण (Analysis), त्यांतील साम्यवैषम्याचा शोध व त्यातून तार्किक परिणतीच्या आधारे सिद्ध होणारे निष्कर्ष ही कोणत्याही विज्ञानाच्या अध्ययन-संशोधनाची पद्धती असते. भाषावैज्ञानिक विवेचन करताना ध्वनिविज्ञान (Phonology), रूपविचार (Morphology), शब्दसिद्धी (Word-formation), वाक्यरचना (Syntax), वाक्प्रचार (Idioms), शब्दसंग्रह (Vocabulary) इ. विभाग असतात व त्यांच्या अनुषंगानं विवेचन केल्यास त्या त्या बोलीच्या स्वरूप वैशिष्ट्यांची कल्पना सहज येते. ती आणखी चांगल्या प्रकारे स्पष्ट व्हावी, यासाठी तिच्यातील उतारेही दिले जातात. भाषाविज्ञानाच्या अभ्यासकाच्या/संशोधकाच्या मनात या सर्व कल्पना स्पष्टपणे असणं आवश्यक आहे. नाहीतर परिश्रमपूर्वक केलेल्या विवेचनाचा अपेक्षित उपयोग/परिणाम होत नाही. त्यानं मनालाही शिस्तच लावायला हवी. मग विवेचन-पद्धतीत विस्कळितपणा येत नाही; किंवा ती भरकटत जात नाही. तिच्यात एक अंगभूत तार्किक (Logical) सुसंगती निर्माण होते. खरं तर एम्.फिल्. किंवा पीएच्.डी.चं संशोधन करताना किमान एवढी तरी प्राथमिक अपेक्षा पूर्ण व्हायला हवी.

'वैशिष्ट्ये' या उपशीर्षकाखाली लेखकानं ध्वनिविचार केला आहे व त्यानंतर पुन्हा 'उच्चारातील भिन्नत्व' या उपशीर्षकाखाली पुन्हा माणदेशीच्या उच्चारव्यवस्थे-विषयीच विचार केला आहे. हे करताना प्रथम स्वर नंतर व्यंजनं व त्यानंतर माणदेशीतील काही ध्वनिपरिवर्तनं यांचं विवेचन अपेक्षित आहे; कारण ही व्यवस्था अध्ययन पद्धती आपण स्वीकारली आहे. या लेखात १) महाप्राणत्व, २) क्रियापदांची बदलती रूपं, ३) आद्य ए - य (यश्रुती) ओ - वो व-श्रुती, ४) व-लोप, ५) अनुनासिक-लोप, अनुस्वार-लोप, ६) वर्णलोप, ७) व-श्रुती, ८) व-लोप, ९) श-स्, १०) ण-त ही ध्वनिपरिवर्तनं आली आहेत. या ध्वनिपरिवर्तनविषयक पारिभाषिक संज्ञा ज्यांनी भाषाविज्ञानाचा थोडा फार अभ्यास केला, त्यांनाही माहीत असतात. (आजच्या भाषेत, माहीत असाव्यात, अशी अपेक्षा आहे.) ध्वनिपरिवर्तन-विचारात एकदम महाप्राणापासून प्रारंभ कसा ? त्यानंतर रूपविचारातील क्रियापद कसं ? बरं ते आलं तर आलं, पण ध्वनिपरिवर्तनाचा विचार करायचा असेल तर पहिल्या तीन उदाहरणांत ओ-उ ही प्रक्रिया सांगायला हवी होती. पुढील दोन उदाहरणं 'य' श्रुतीची आहेत. खरं तर हे क्रियापद-प्रकरण मूळ 'रूप विचारा'तच 'वर्ग' करायला हवं होतं. माणदेशीतील स्वरपरिवर्तनाचा विचार यात कितीसा आला ?

त्यानंतर एकदम अर्धस्वरांचा (य, व यांचा) विचार 'य'श्रुती, य-लोप, वश्रुती, व-लोप इ.) क्र. ४, ५ (विंचू-इंच्चू), ७-८ यांच्यामध्ये येतो. क्र. ९ मध्ये श्-स् व क्र. १० ण्-न् या दोन व्यंजनांचा (अनुऊष्मे व अनुनासिक) विचार येत असला तरी त्या नेहमीच्या घडणाऱ्या फार सामान्य ध्वनिप्रक्रिया आहेत, त्यांतील पाणी-पानी, गाणे-गाने, पाहुणा-पाव्हणा, बहिणी-भनी ही रूपें ग्रामीण मराठीत सर्रास आढळतात. क-२ एवढासा-उलीसा या उदाहरणातील उच्चार परिवर्तनाचा खुलासा कसा काय करणार ? आणि हे माणदेशीचंच वैशिष्ट्य कसं ? ते तर मराठवाडीत व अन्य मराठी बोलीतही आढळतं. शिवाय पाहुणा-पाव्हणा यात 'व' श्रुतीही आहे का ? 'वर्णलोप' ही फार व्यापक संज्ञा

झाली. तिच्यात 'विहीर-हीर' हे उदाहरण देता येईल का ? तेही व-लोपाचंच उदाहरण नाही का ? शिवाय ते रूप (विहीर-हीर) ग्रामीण मराठीतही आढळतं ना ? मग ते केवळ माणदेशीचंच वैशिष्ट्य कसं ?

ग्रामीण मराठीतील अशी अनेक उदाहरणं लेखकानं दिलेल्या यादीतूनच उद्धृत करता येतील.

(क्र. ४) विस्तव-अिस्तू, वीस-इस, वेळ-येळ, विटी-इटी, (क्र. ५) चिंच-चिच, गुंतला-गुतला, विंचू-इच्चू, (क्र. ७) ओकारी-वकारी, ओटा-वटा, ओसरी-वसरी, विडा-इडा.

**उच्चारातील भिन्नत्व**

या उपशीर्षकाखालील माणदेशी रूपं यातील उदाहरणे मराठी ग्रामीण रूपांशी जुळतात. उदा. तेथे-ततं, पुन्हा-पुनिंदा इ. हे माणदेशी शब्द वेगळेपणे कसे उच्चारले जातात ते कळत नाही.

'काही ग्रामवाचक नावांचा उच्चार प्रादेशिक केला जातो' या वाक्याचा अर्थ मला कळला नाही. 'काही, इतर शब्द' या उपशीर्षकाखाली 'गव्ह' (गहू) व 'वट्ट' (सर्व) इ. शब्द दिले आहेत, ते ग्रामीण मराठीतही आहेत.

माणदेशीवर कन्नडचा प्रभाव आहे, असं लेखकानं दोन तीनदा म्हटलं असलं तरी त्याची उदाहरणं दिल्याचं मला आढळलं नाही.

'व्याकरणदृष्ट्या माणदेशी बोली मराठीला अगदीच जवळची आहे' असं लेखकानं म्हटलं असलं तरी या व्याकरण-साम्याचा सोदाहरण विचार लेखात केलेला नाही. शब्दसिद्धी (Word formation), (अर्थप्रक्रिया (Semantics), वाक्यरचना, शब्दसंग्रह या उपविभागांना स्पर्शही झाला नसल्याचं जाणवलं.

माणदेशीविषयी लेखकाजवळ भरपूर सामग्री असेल पण तिचा योग्य उपयोग झाल्यावर जे समाधान मिळायला हवं, ते मात्र मिळत नाही.

❖❖❖

**पद्मश्री डॉ. यू. म. पठाण**
२, आनंदनगर, टाऊन हॉल, औरंगाबाद-४३१००१,
दूरध्वनी (०२४०) ६५०१९८६, २४०२०८२.

---

**(पान क्र. १३ वरून पुढे चालू...)**

गर्विष्ठ असणारी भामिनी पराक्रमी अशा धैर्यधराच्या सहवासात आल्यामुळे पवित्र झाली; आणि प्रभावी ठरली. खाडिलकरांनी सूचित केलेला हा नाट्यार्थ ! शिवाय नांदी, भरतवाक्य म्हणजे देवतांची स्तुती हा ढोबळ अर्थ जरी दिसत असला तरी खाडिलकरांच्या 'मानापमान' या संगीत नाटकातील नांदी आणि भरतवाक्यामध्ये केवढा मोठा गर्भितार्थ दडलेला आहे. हे आपल्याला जाणवते. 'सं. मानापमान' नाटकाच्या जन्मशताब्दिवर्षानिमित्त 'नांदी ते भरतवाक्य' ह्या नाट्याविष्काराचे पुनःस्मरण !

**टीपा :**

१) खाडिलकरांनी नांदीच्या शेवटी स्वतःची नाममुद्रा उमटविली आहे. याबाबतीत त्यांनी किर्लोस्करांचे अनुकरण केलेले असावे. जसे- 'पंचतुंड नररुंड' या 'शाकुंतल' नाटकाच्या नांदीच्याशेवटी ''बलवत् कवी निजवा पुष्पी रसिकार्चन करितो'' या ओळीत 'बळवंत' (बलवत्) ही स्वतःची नाममुद्रा किर्लोस्करांनी उमटविली आहे.

२) संस्कृत नाटकांपैकी 'स्वप्नवासबदत्ता' या प्रसिद्ध नाटकाची नांदी काव्यार्थसूचक आहे जसे- ''उदयनवेन्दुसवर्णावासवदत्तावलौ बलस्य त्वाम् ।'' इ.

३) 'दे हाता शरणागता' या पदासाठी 'फसवे' पद असा उल्लेख वसंत शांताराम देसाई यांनी केलेला आहे.

**संदर्भ :**

१) वेध संगीत नाटक आणि नाट्यसंगीत - डॉ. श्रीरंग संगोराम.
२) संगीताने गाजलेली रंगभूमी- श्री. बाबूराव जोशी.
३) लोकराज्य- बालगंधर्व जन्मशताब्दी विशेषांक १९८७
४) महाराष्ट्र टाईम्स- बालगंधर्व जन्मशताब्दी विशेषांक
५) स्मृतीगंध - पं. पद्माकर देव
६) मोगरा फुलला - बालगंधर्व रसिक मंडळ, स्मरणिका- पुणे मार्च २०१०
७) संस्कृत-प्राकृत प्राच्यविद्या आणि प्राचीन भारतीय संस्कृती तसेच संगीतकलेचे व्यासंगी अभ्यासक डॉ. देवीप्रसाद खरवंडीकर यांचे मार्गदर्शन.

❖❖❖

**सौ. धनश्री मकरंद खरवंडीकर**
गीतायन, गुलमोहोर रोड, सावेडी, अहमदनगर ४१४ ००३
भ्रमणध्वनी : ९८२२३९१२४०, निवास : ०२४१-२४२२४४०

## विनोदजीवी सन्मित्र

## कै. प्राचार्य बाळ गाडगीळ

- म. द. हातकणंगलेकर

*[सुप्रसिद्ध विनोदी साहित्यिक आणि फर्ग्युसन महाविद्यालयाचे माजी प्राचार्य बाळ गाडगीळ यांचे रविवार दि. २१ मार्च २०१० रोजी निधन झाले. प्राचार्य बाळ गाडगीळांचे जुने स्नेही आणि मराठी साहित्यातील एक बुजुर्ग साहित्यिक प्रा. हातकणंगलेकर यांनी म. सा. पत्रिकेसाठी आवर्जून पाठविलेली ही शब्दरूप श्रद्धांजली! –संपादक]*

माझी आणि प्रा. पी. एल्. तथा बाळ गाडगीळ यांची लेखक, वाचक या नात्याने अनेक वर्षापासूनची म्हणजे १९५० पासूनची ओळख, त्यावेळी त्यांचे 'सिगरेट व वसंत ऋतू' या नावाचा विनोदी लेखांचा संग्रह प्रसिद्ध झाला होता. त्यातल्या प्रसन्न विनोदी वृत्तीचा आविष्कार मला हृद्य वाटला होता. तो विनोद खेळकर होता. विनोदी लेखनाला अपरिहार्य मानल्या जाणाऱ्या तुच्छतादर्शक प्रवृत्तीची कोणतीही छटा अतिशयोक्त पद्धतीने आविष्कृत करणारा नव्हता. विनोदाला परिपाठाने आवश्यक मानली गेलेली अतिशयोक्ती पण ती निर्मळ, तुच्छतादर्शक नव्हे अशी व्यक्त झालेली होती. एकूण तो विनोद एका सुसंस्कृत माणसाचा, खेळकर विनोदाचा आविष्कार होता. तो मला विलोभनीय वाटल्याने, त्यावेळी मी त्यांची भेट घेतली, तेव्हा ते विनोदी लेखकाला विसंगत असे सुसंस्कृत, आकर्षक व्यक्तिमत्त्वाचे देखणे व्यक्तिमत्त्व मला वाटले, त्यांनी माझे जे अगत्यशील आगतस्वागत केले त्याच्या तपशीलात मी जाऊ इच्छित नाही. तो माणूस मला आवडला इतका संस्कार अनेक वर्षांनंतरही मी विसरू शकत नाही. त्यानंतर आजपर्यंत अनेक दशके उलटली आहेत अनेक घटना झालेल्या आहेत. इतक्या प्रदीर्घ कालखंडात अनेक घटना घडल्या तरी त्यावेळी माझ्या मनावर उमटलेला त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा संस्कार मला पुसून टाकता येत नाही. इतक्या दशकानंतरही त्यांच्या सौजन्याचा माझ्या मनावरचा संस्कार अवाधित आहे, पुढे आमची ओळख वाढत गेली. त्यांच्या लेखनात सातत्य असल्याने दिवाळी अंकातील त्यांचे लेखन मी वाचत राहिलो. त्यांची पुस्तके जशी प्रसिद्ध होतील तशी ती मला ते पाठवत राहिले. त्यांचे काही लेख शब्दांचा खेळ, चातुर्याने साकार करणारे होते, 'एकच प्याला पण कोण ? किंवा अखेर पडदा पडला.



बाळ गाडगीळ

अमेरिकेच्या शिकॅगो विद्यापिठात त्यांनी अर्थशास्त्राचा उच्चस्तरीय अभ्यास केला. भारतात परत आल्यानंतर त्यांनी इन्कमटॅक्स खात्यात अधिकारी म्हणून काम पाहिले. अन्य खात्यातही काम केले असावे पण ते अल्पकाळ. नंतर रेसकोर्सवर काही काळ त्यांनी घालवला. त्या काळात नानी पालखीवाला यांच्याशी त्यांचा परिचय झाला. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांशी त्यांची जवळून ओळख झाली. त्यांच्याबद्दल ते नेहमी आदराने बोलत. यथावकाश त्यांची फर्गसन कॉलेजमध्ये अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून नियुक्ती झाली. त्याच सुमारास सांगली येथील विलिंग्डन महाविद्यालयात मी इंग्रजीचा प्राध्यापक म्हणून रूजू झालो. पुढे आम्ही डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य म्हणून एकाच वर्षी, १९६२ साली प्रवेश केला. आमच्यावरोवर डॉ. प्र. चिं. शेजवळकरांचाही प्रवेश झाला. त्यामुळे आम्ही Joint Board of Life members या समितीचे सभासद झालो. या समितीच्या वैठका पुण्यात होत असत त्यावेळी आम्ही एकत्र येत असू. त्यावेळी बाळ गाडगीळ भेटत. ते गंभीर, सभ्य, सौजन्यपूर्ण वागत व बोलत, आवश्यक वाटला तर नर्म विनोद करीत. त्यावेळी त्यांच्या लेखनाबद्दल साधकबाधक बोलणे होत असे. अनेक दिवाळी अंकात त्यांचे लेखन प्रसिद्ध होत असे. लेखनात त्यांचा सिद्धहस्त होता. लिहिणे स्वच्छ व प्रवाही. त्यात खाडाखोड करण्याची गरज भासत नसे. मराठी, इंग्रजी दोन्ही भाषेत प्रवाही लेखन, तसे त्यांचे वक्तृत्व होत नसे. पण त्यांत बरेच किस्से व आठवणी पेरलेल्या असत.

प्रा. बाळ गाडगीळ यांचे पुण्यामुंबईकडचे अनेक स्नेही



अनुक्रमणिका

आणि प्रकाशक होते. कथाकार विद्याधर पुंडलिक, श्री. ज. जोशी, बनहट्टी, पारगावकर, गंगाधर गाडगीळ, के. ज. पुरोहित, मॅजेस्टिकचे कोतवळे, मौजचे श्री. पु. भागवत, दि. बा. मोकाशी आणखी कितीतरी, सोसायटीत मित्र नसत, स्पर्धकच (छुपे) असत. एका घटनेमुळे हे अगदी स्पष्टच झाले. आमच्या एका सभेत त्यांची बदली सांगलीस चिंतामण व्यापार महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून करण्यात आली. पुणे व तिथला अनेक वर्षांचा परिवार, नातेवाईक, मित्रमंडळी साहित्यिक संदर्भ सोडून पुणे सोडणे ही त्यांना एकप्रकारची शिक्षाच होती. पण कोणतीही आदळआपट, आकांड तांडव करणे हे गाडगीळांच्या स्वभावात नव्हते. ते सांगलीला आले. आजीव सेवक, प्राचार्य यांच्या निवासासाठी, आवारात बंगले राखून ठेवलेले असत. यथावकाश ते स्थिर झाले. कामाचे काही ओझे नव्हते. सौ. गाडगीळांनी आपला गाण्याचा रियाज सुरू केला. तो सकाळी चालत असे. रस्त्यावर फिरायला बाहेर पडणाऱ्या माणसांना तो परिचयाचा झाला. सुदैवाने प्राचार्य गाडगीळांचे मराठे नावाचे निवृत्त मित्र रस्त्यापलिकडच्या बंगल्यात राहतात; असा शोध त्यांना लागला. ते मित्र ब्रिज खेळण्याचे शौकिन होते. त्या घरात ब्रीज खेळण्यासाठी जाता येत असे. तो एक आनंददायक विसावाच झाला.

ते सांगलीत, स्थिर झाल्यानंतर त्यांचे अनेक साहित्यिक मित्र यांच्या आनंदभेटी सुरू झाल्या. ती आम्हाला एक पर्वणीच होती, एकदा प्रा. गंगाधर गाडगीळ आपल्या मुलाबरोबर आले होते, त्या मुलाने गन आणली होती. त्यांचा पाखरावर नेम मारण्याचा उद्योग चालला होता. आणखी एकदा कथा कथन करणारे तीन शिलेदार, मिरासदार, व्यंकटेश माडगूळकर व शंकर पाटील यांची फेरी झाली. या बाजूला दोन-तीन ठिकाणी त्यांना आवतणे होती. शंकर पाटील त्यांच्यातले अग्रणी. नकला करून ते धमाल उडवून देत. नंतर गाडगीळांचे खास मित्र, श्री. ना. बनहट्टी. ते आमच्या छापखान्याना छापेकर म्हणत. नेहमीचे कामकाज सुरू असे. विद्यार्थ्यांना प्रवेश, उपप्राचार्यांची नियुक्ती, व्याख्यात्यांच्या नेमणुका, यातले बरेच काम नानवडे नावाचे जे हेडक्लार्क अगर रजिस्ट्रार होते; ते हौसेने व कार्यक्षमतेने करीत. काही वर्षांनंतर गाडगीळांची बदली फर्गसन कॉलेजचे प्राचार्य म्हणून करण्यात आली. ते निवृत्त होईपर्यंत त्यांनी फर्गसनच्या विकासासाठी अनेक कामे केली, योजना तयार केल्या, देणगीदाराकडून गेस्ट हाऊससाठी मोठी देणगी मिळवली, तसेच खुल्या नाट्यगृहासाठी पु. ल. देशपांडे यांची मोठी देणगी मिळविली. सुप्रसिद्ध चित्रकार देऊसकर यांना काम करण्यासाठी आवारात स्टुडिओसाठी जागा मिळवून दिली आणि त्यांच्याकडून सोसायटीच्या संस्थापकांची हितचिंतकांची अप्रतिम तैलचित्रे तयार करून घेतली. त्यात पु. ल. देशपांडे यांचे अप्रतिम तैलचित्र होते. माजी नामवंत फर्गसनच्या विद्यार्थ्यासाठी एक गेस्ट हाऊस तयार करून घेतले. फर्गसनमध्ये डॉ. शं. बा. मुजुमदार या नावाचे उत्तम प्राध्यापक होते. त्यांच्याबद्दल काहीसा आकस होता. कारण त्यांनी विद्यापीठाच्या कामकाजात विधायक लक्ष घातले होते. प्राचार्य गाडगीळ हे त्यांची बाजू घेत. त्याला नंतर उत्तम फलप्राप्ती झाली. निवृत्त झाल्यावर प्राचार्य गाडगीळ काही काळ पुणे विद्यापीठाचे प्रभारी कुलगुरू होते.

त्यांच्या व्यवस्थापकीस जबाबदाऱ्यांबरोबर त्यांचे लेखन सातत्याने चालू असे, त्यांच्या 'लोटांगण' यांच्या पहिल्याच विनोदी कथासंग्रहाला पु. ल. देशपांडे यांच्या 'अपूर्वाई' बरोबर महाराष्ट्र शासनाचे पहिले पारितोषिक विभागून मिळाले होते. 'सिगरेट व वसंतऋतू' या प्रवासवर्णनाला राज्य सरकारचे पारितोषिक मिळाले होते. बडोदे येथे १९७३ मध्ये झालेल्या मराठी वाङ्मय परिषदेचे, मुंबई येथे १९९२ मध्ये झालेल्या मराठी वाङ्मय





अनुक्रमणिका

परिषदेचे, मुंबई येथे झालेल्या १९९२ मध्ये झालेल्या विनोदी साहित्य संमेलनाचे आणि १९९५ साली पुणे, कोथरूड येथे झालेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते. एवढे विपुल लेखन करून आपली योग्य ती दखल घेतली जात नाही याची त्यांना खंत वाटत असे. असे का घडले यांचा नेमका उलगडा होत नाही; पण ही वस्तुस्थिती आहे यात शंका नाही. त्यांनी 'रानोमाळ' ही जी कादंबरी लिहिली तिची नोंदही केली जात नाही हे योग्य नव्हे, वास्तविक ती एक उत्तम कादंबरी आहे. त्यांच्या विनोदी लेखनावर मी, महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या एका अंकात एक सविस्तर लेख लिहिला होता. 'गाडगीळांच्या लेखनातील ऊन सावली' असे नाव असावे. त्याचा त्यांना अतिशय हर्ष वाटला. त्या अंकावर त्यांचा सुरेख फोटो दिला होता. तसे गाडगीळांच्या घराण्यात अनेक नामवंत, यशस्वी, व्यासंगी भावंडे होती, आहेत. पॉप्युलर हे जिमखान्यावरचे उत्तम पुस्तकाचे दुकान चालवणारे त्यांचे बंधू बंडोपंत. यांच्याकडे जुन्या पुस्तकांचा दुर्मिळ संग्रह आहे. त्यांचे वडीलबंधू अमरेंद्र गाडगीळ हे संघाचे कार्यकर्ते होते आणि हिंदू देवतांवर त्यांनी लेखन केले होते. पुढे बाळ गाडगीळांनी 'वळचणीचे पाणी' या नावाने आपले आत्मचरित्र लिहिले. त्याचा पुढे एक इतिहास झाला. त्यातील काही मजकुरावर आक्षेप घेऊन डॉ. बोकील, हे त्यांचेच सहकारी, यांनी कोर्टात केस दाखल केली. ती बराच काळ चालली व त्यामुळे बाळ गाडगीळाना फार मनस्ताप सहन करावा लागला. 'Unity is strength' या प्रेरक ब्रीदवाक्याने एकत्र नांदणारे जन्माचे सहकारी-साताजन्माची गोष्टच सोडा- एकमेकांच्या गळ्यासाठी हे दृश्य फार बोधप्रत होते. प्रा. बाळ गाडगीळांच्या आत्मचरित्राचे प्रकाशन साहित्य परिषदेच्या सभागृहात पार पडले. निवडक लोक होते. मा. पतंगराव कदम यांच्या अध्यक्षतेखाली कार्यक्रम ठरला होता. पतंगरावांच्या रिवाजाप्रमाणे ते अकस्मात त्वरेने प्रवेश करून व्यासपीठावर आरूढ झाले, त्यांचे म्हणून असणारे चैतन्य त्यांनी प्रस्थापित केले. कौतुक, वात्सल्य आणि शुभाशीर्वाद दिले. भरघोस सन्मान झाला.

पुढे त्यांचे दीर्घकालिन मित्र डॉ. शं. बा. मुजुमदार यांनी 'सिम्बॉसिस' या नावाचा परदेशातील विद्यार्थ्यांसाठी एक प्रकल्प उभा केला. त्यासाठी पुण्याच्या मध्यवर्ती ठिकाणी एक नेत्रदीपक वास्तू उभी केली. तिचा विस्तार वाढतच गेला. या संस्थेचे उपाध्यक्ष म्हणून प्राचार्य गाडगीळांची त्यांनी नियुक्ती केली आणि ती अखेरपर्यंत सांभाळली. सिम्बॉसिसच्या अगदी वरच्या मजल्यावर गाडगीळांचे सुरेख ऑफिस. येण्याजाण्यासाठी मोटर, ड्रायव्हर, एकाद्या सनदी अधिकाऱ्याप्रमाणे त्यांची तैनात होती. त्यांचा शब्द हा डॉ. मुजुमदारासाठी अखेरचा शब्द, त्यांच्यावर ज्यावेळी खटला चालला होता. आणि गाडगीळ त्रस्त मनस्थितीत होते तेव्हा मुजुमदारांनी त्यांना सांगितले, तुम्ही काळजी करू आपण पालखीवालेना बोलवून घेऊ. पण गाडगीळांना जो मनस्ताप व्हायचा तो झालाच. मी पुण्याला गेलो की, त्यांच्याकडे आवर्जून जात असे. तासभर त्यांच्याकडे बसत असे. अखेरच्या आजाराचे स्वरूप गंभीर होते; हे नंतर आमच्या लक्षात आले. नोकर, नर्स सर्वकाळ काम करीत असत. डॉ. मुजुमदारांनी सर्व सुविधा पुरविल्या होत्या. आजार अधिकाधिक बळावत चालला होता. याकाळात त्यांनी आपल्या परिस्थितीचे वर्णन करणारे एक दीर्घ पत्र मला लिहिले होते. ते वाचून मी गलबलून गेलो. 'खूप लिहून झाले हे खरे. आता हातात फक्त डॉ. मुजुमदारांचे चरित्र लिहायचे आहे. तशी मी सिंबायसिसवर तीन पुस्तके लिहिली आहेत. पुण्यात कुणी मित्र उरलेच नाहीत. जोशीबुवा (श्री. ज. जोशी) पारगावकर, ग. बा. बेहरे, शंकर पाटील इ. सगळे गेले. प्रकाशक निपुणगे येतात. चि. दिलिप Sugar cane waste च्या disposal ची विद्या शिकला आहे. तो खूप कामात असतो. थेट इंडोनेशियापर्यंत जाऊन आला आहे. संध्याकाळी तो थोडा वेळ माझ्यासाठी देतो. वाचायला बरेच आहे पण लक्ष लागत नाही. एकेकाळी डिटेक्टिव्ह कादंबऱ्या ते मला भरभरून देत असत. पुढे त्यातली माझी चवही कमी झाली. आता तुमच्यासारख्या स्नेहाचा सहवास एवढाच पर्याय उरतो.' आता तो पर्याय निवडायला तेच राहिले नाहीत. माणसं जिवंत आहेत तोपर्यंतच सारे काही खरे आणि आनंदमय असते. नंतर राहतात त्या आठवणी !

❖❖❖

**म. द. हातकणंगलेकर**

'निर्वेद' कुपवाड रस्ता, विश्रामबाग, सांगली ४१६ ४१५

दूरध्वनी : (०२३३) २३०४८५० भ्रमणध्वनी : ९४२३०३८३२२



अनुक्रमणिका

# मं. वि. राजाध्यक्ष आणि अनोखा 'वाद-संवाद'

मंगला देसाई

*[इंग्रजी भाषेचे प्राध्यापक, पाठ्यपुस्तक व अभ्यासक्रम संशोधन मंडळाचे अध्यक्ष, नॅशनल बुक ट्रस्ट विश्वस्त, लेखक तसेच भाषा आणि समाजजीवनावर मार्मिक भाष्य करणारे समीक्षक-साहित्यिक मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष यांचे २० एप्रिल २०१० रोजी वयाच्या ९६ व्या वर्षी निधन झाले. विद्वत्ता आणि मिष्कीलपणा यांचा सुरेख संगम असलेल्या मं. वि. राजाध्यक्षांच्या 'अभिरूची' मधील 'वाद-संवाद' सदरातून 'निषाद' ह्या टोपणनावाने सामाजिक आणि सांस्कृतिक ढोंगावरील लक्ष्यवेधी टीकेचा हा अल्प परिचय... 'त्यांना 'श्रद्धांजली' वाहण्याच्या निमित्ताने !*
*-संपादक]*

मराठीतील ज्येष्ठ समीक्षक, टीकाकार मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष यांचे नुकतेच मुंबई येथे निधन झाले. मराठी भाषा-साहित्य-संस्कृती यांच्याविषयी विलक्षण आस्था, तळमळ असलेले, भाषेचे स्वरूप व तिचा साहित्यातील वापर याविषयी सजग असलेले मंवि हे जणू भाषेच्या उत्कर्षाच्या ध्यासाने झपाटलेले प्रगल्भ व्यक्तिमत्व होते.

मंवि यांचा जन्म ७ जून १९१३ रोजी मुंबई येथे झाला. एल्फिन्स्टन कॉलेज मुंबई येथून त्यांनी इंग्रजी व संस्कृत विषयात पदव्युत्तर पदवी घेतली. नंतरची जवळजवळ ३५ वर्षे त्यांनी विविध महाविद्यालयामध्ये इंग्रजीचे अध्यापन केले. साहित्य अकादमी, नॅशनल बुक ट्रस्ट, भारतीय ज्ञानपीठ मंडळाचे ते मान्यवर सदस्य होते.

मंवि यांच्या वाङ्मयीन प्रवासाची सुरुवातच मुळी 'अभिरुचि' पासून झाली. मराठी नियतकालिकांच्या इतिहासातील एक दर्जेदार नियतकालिक म्हणून ख्याती मिळविलेले 'अभिरूचि' हे मासिक फेब्रुवारी १९४३ साली पु. आ. चित्रे (बाबुराव) व विमल चित्रे या दाम्पत्याने बडोदा येथून सुरू केले. हे मासिक सुरू करण्यामागे आ. रा. देशपांडे (कवी अनिल) व कुसुमावती देशपांडे या दाम्पत्याचा तसेच स्वतः मंवि यांचा प्रेरणादायी पाठिंबा होता. 'अभिरूचि'च्या पहिल्या चार अंकात 'टिपा व टिपणे' या नावाचे साहित्य सृष्टीविषयीचे सदर मंवि यांनी 'निषाद' या टोपणनावाने लिहिले. पाचव्या अंकापासून 'वादसंवाद' असे त्या सदराचे नामकरण झाले. 'निषाद'ला 'शमे'च्या (द. ग. गोडसे यांच्यया) व्यंगचित्रांची उत्कृष्ट साथ मिळाली. 'अभिरूचि'मधूनच पु. ल. देशपांडे, रा. वा. अलूरकर व स्वतः मंवि या तिघा जिवलग मित्रांनी मिळून 'पुरूषराज अलूरपांडे'-मौजे पिरलई या टोपणनावाने विडंबनवजा लेख लिहिले.

१९४६ साली मंवि यांनी 'पाच कवी' या काव्यसंग्रहाचे संपादन केले. विविध नियतकालिके, वृत्तपत्रे यांत त्यांनी केलेले सदरलेखनच बहुतांशी पुस्तके रूपाने प्रसिदाद झाले. 'आकाशभाषिते', 'खर्डेघाशी', 'अम्लान', 'शालजोडी', 'पंचम', 'पाक्षिकी', 'शब्दयात्रा', 'भाषाविवेक', 'वादसंवाद', 'पुरुषराज अलूरपांडे', 'मनमोकळं' ही त्यांनी लिहिलेली पुस्तके कुसुमावती देशपांडे यांच्या सहकार्याने 'A History of Marathi Literature' हा ग्रंथही त्यांनी लिहिला.

वर निर्देश केलेले 'अभिरूचि'तले 'वादसंवाद' हे सदर चांगलेच गाजले.

**व्युत्पन्नता व रसिकता यांचे अनोखे मिश्रण**

मंवि यांनी वाद-संवाद मध्ये साहित्य व कला सृष्टीशी संबंधित असणाऱ्या विविध विषयांना स्पर्श केला. कथा, कविता, कादंबरी, नाटक, चरित्रवाङ्मय, भाषांतर, कोशवाङ्मय, व्याकरण, वाङ्मयाचा इतिहास, विविध परिषदा, संमेलने, रंगभूमी, चित्रकला चित्रपट, दिवाळी अंक, वाङ्मयचौर्य, कंपूवाजी, कळपशाही इत्यादी विषयांचा परामर्श त्यांनी वाद-संवाद मध्ये घेतला. त्यांच्या तीक्ष्ण नजरेने, मार्मिक व प्रसंगी मर्मभेदक लेखणीने साहित्य कगला व्यवहारातील बारीक-सारीक बदल टिपले. साहित्य कलाविषयीची हार्दिक तळमळ हेच 'वाद-संवाद'चे प्रेरणास्त्रोत होते. त्यांनी चांगल्याची भलावण केली व येन-केन मार्गाने साहित्य-व्यवहार भ्रष्ट करणाऱ्यांवर टीका केली. छिद्रान्वेषी वा व्यक्तिद्वेषी

(पान क्र. ४४ वर पहा...



अनुक्रमणिका

पुस्तक परिचय

# अस्तित्वाची शोधयात्रा

प्रा. मिलिंद जोशी

काळाची स्पंदने नेमकेपणाने टिपणाऱ्या कवयित्री म्हणून अंजली कुलकर्णी यांचे नाव सर्वांना माहीत आहे. 'मी एक स्त्रीजातीय अस्वस्थ आत्मा', 'संवद्ध' या त्यांच्या कवितासंग्रहांनी त्यांची वेगळी ओळख निर्माण केली. 'बदलत गेलेली सही' हा त्यांचा कवितासंग्रह ग्रंथालीने प्रकाशित केलेला आहे. हा कवितासंग्रह म्हणजे अस्तित्वाची शोधयात्रा आहे.




गेल्या शंभरवर्षात जेवढे बदल घडले नाहीत. तेवढे या वीस वर्षात घडले. ज्या जागतिकीकरणाच्या संदर्भात चर्चा सुरू होती; ते उंबरठा ओलांडून घरात कधी शिरले; ते समजलेच नाही. माणसाच्या जगण्याचा पोत बदलला. मूल्यव्यवस्था बदलायला लागली. जे जे वाईट म्हणून संस्कृती धिक्कारत होती; त्यालाच प्रतिष्ठा प्राप्त झाली. या सगळ्या प्रकारात माणसांची ओळख हरवत गेली. छातीवर लावलेले 'ओळखपत्र' हीच त्याच्या अस्तित्वाची खूण आहे की काय, असे वाटायला लागले. सत्व शोधायला निघालेली माणसे 'स्व'त्व कधी हरवून बसली; हे कळले नाही. या सर्व स्थित्यंतराचा वेध नेमकेपणाने अंजली कुलकर्णी यांनी 'बदलत गेलेली सही' या कवितासंग्रहात घेतला आहे.

सही म्हणजे 'स्व' ओळख. आज ही स्व ओळखच नाहीशी होत आहे. समाज म्हणजे माणसाची साखळी असे चित्र मनात होते; पण समाज म्हणजे साखळी नसलेल्या माणसांची गर्दी, असे चित्र का निर्माण झाले ? याचे चिंतन या कवितेमध्ये आहे. प्रत्येक गोष्ट पैशाच्या तराजूत मोजण्याच्या नादात मानवाचे यंत्रमानव कसे बनत गेले, याच्या अस्वस्थ करणाऱ्या कहाण्या या कवितेमध्ये आहेत. किती पळायचे ? कशासाठी पळायचे ? आणि कुणासाठी पळायचे ? याचा सारासार विचार न करता केवळ धावत राहणाऱ्या आणि स्वतःच्या हाताने स्वतःचे जीवन चक्रव्यूहात अडकविणारी माणसे अंजली कुलकर्णीच्या कवितेमध्ये भेटतात. नव्या यांत्रिकीकरणाने त्यांच्या आयुष्यात निर्माण केलेले ताणतणाव, दिवसेंदिवस नातेसंबंधात वाढत चाललेली गुंतागुंत, विरळ होत चाललेले प्रेमाचे धागे यांचे प्रभावी चित्रण या कवितांमध्ये आहे.

जागतिकीकरणानंतर जग जवळ आले आहे. जगाचे खेडे झाले आहे; अशी चर्चा सर्वत्र ऐकायला मिळते. पण खेड्यातली माणुसकी या जगात आहे का ? असा सवाल कवयित्री विचारते. शाळेत चित्रकलेच्या तासाला विद्यार्थ्यांना जी चित्रे काढायला सांगितली जातात त्यांचेही संदर्भ, विषय बदलले आहेत. वैश्विक खेड्याचे चित्र काढताना त्यांच्या मनातला मुलगा गुरुजींना म्हणतो-

*"या सगळ्यांच्या पाठीमागे काढलेत पहा*
*डॉलर्सचे डोंगर पाठीराखे भरभक्कम*
*त्यातून डोकावतोय ना तो सूर्यही अमेरिकेचा*
*आणि ही बघा गुरुजी, आयटी पार्कमधली*
*गुबगुबीत सॅलेरी पॅकेजची कबुतरं*
*सुपरमॉलच्या हिरवळींवर दाणे टिपणारी*
*गुरुजी, उडवू का यांना पश्चिमेकडे*
*म्हणजे पूर्ण होईल चित्र रम्य खेड्याचे."*

या जगात कोणती एक गोष्ट कायम आहे; याचे उत्तर देताना शास्त्रज्ञ सांगतात, 'बदल' ! आजपर्यंत बाह्यबदलास प्रगती मानून माणसे वाटचाल करीत आहेत, असे कवयित्रीला वाटते. 'दिवस संपले' या कवितेत त्या सांगतात. दिवस संपले-निष्ठेचे, त्यागाचे, प्रेमाचे,

बंधुभावाचे, ध्येयवादाचे, विचारसरणीचे, देशभक्तीचे, लढ्यांचे, चळवळीच्या कार्यकर्त्यांचे, झोळ्यांचे, शबनमचे, हस्तलिखितांचे, मार्क्स-लेनिनचे, गोळवलकरांचे, जयप्रकाश, बाबासाहेब, सानेगुरुजींचे शब्द नामशेष झाले... स्वातंत्र्यलढा, लोकशाही बंधुता, समता, भूमिगत, फुलटायमर, दिवस आले- संगणकाचे जागतिकीकरणाचे, खाजगीकरणाचे, चॅनल्सचे, मिडीयाचे, मार्केटचे, आयटीचे, सॅलरीपॅकेजचे, सुपरमॉलचे, डान्स बारचे, फूड फेस्टीव्हलचे ! गर्भलिंगपरीक्षेचे, एन्‌काऊंटरचे, टेररिस्टचे !! देश विकण्याचे, मुलगी विकण्याचे आणि आत्मा विकण्याचे!! झपाट्याने बदलत चाललेला समाज या कवितांमधून दिसतो. निराशेचे राग न आळवता वास्तवाची दशके घडविणाऱ्या या कविता आहेत.

बदलांच्या या कवितांबरोबर स्वतःची ओळख शोधू-जपू पाहणारी स्त्री जशी त्यांच्या कवितांमधून दिसते; तशीच सनातन परंपरेच्या वर्तुळाच्या आतबाहेर अडखळणारी आणि अजूनही चेहरा न मिळालेली स्त्रीही त्यांच्या कवितांमध्ये भेटते.

अस्तित्वाच्या शोधयात्रेकडे गांभीर्याने पाहणारी अंजली कुलकर्णींची कविता पंथाभिमानी नाही. आक्रस्ताळी नाही. आपल्या निरीक्षणांना चिंतनाच्या तराजूत तोलून मापून संयमाने आणि अलिप्तपणाने हृद्‌गत मांडणारी आहे. आपल्या 'बदलत गेलेल्या सहीचा' प्रवास अनुभवण्यासाठी आणि अभ्यासण्यासाठी हा कवितासंग्रह वाचायला हवा.

❖❖❖

'बदलत गेलेली सही' - अंजली कुलकर्णी (९९२२०७२१५८)
'ग्रंथाली' दादर, मुंबई ४०० ०२८ डिसेंबर २००९

**प्रा. मिलिंद जोशी**
joshi.milind23@gmail.com

---

(पान क्र. ४२ वरून पुढे चालू...)

टीका हा त्यांचा प्रांत नव्हता. पण त्यांची टीका लेचीपेची ही नव्हती ती प्रसंगी कडक व आक्रमकही होती.

टीका हा खरे तर गंभीर वाङ्मय प्रकार. गंभीरचा अर्थ नेहमीच खोलपणाशी ! पण गंभीर साहित्यिक विचार देखील खेळकरपणे मांडता येतात आणि विद्वत्ता आणि विनोद यांचे वावडे असलेच पाहिजे असे नाही हे त्यांनी 'वाद-संवाद' मधून दाखवून दिले. या अर्थाने मंवि हे खेळकर विद्वान होते आणि त्यांची विद्वत्ता ही आस्वाद घेणाऱ्याची होती; वाचनाची संग्रही नोंद करणारी नव्हती. वाचन हा त्यांच्या व्यक्तित्त्वाचा अविभाज्य भाग होता. कर्मठ साहित्यिक ज्याला साहित्य मानीत नाहीत, असेही त्यांनी शिस्त, दिशा, नेम यांनी बांधून न घेता वाचले. 'वाद-संवाद'चे संशोधन करताना त्यांच्या वाचनाचा व अभ्यासाचा परीघ पाहून मी स्तिमित झाले. यामध्ये नेहमीच्या लेखकांबरोबर कोशवाङ्मयकार, पत्रकारही होते. संहिता लेखन करणाऱ्यांबरोबर स्तंभलेखकही होते तर मानसशास्त्रज्ञ, साहित्यशास्त्रज्ञ यांच्याबरोबर भौतिकशास्त्रज्ञही होते. नेहमीच्या शेली, कीटस्, बायरन, शेक्सपिअर या मंडळींबरोबर पीरांदेलो, ओनील, चापेक, मेटरलिंक यांसारखे लेखकही आपलेसे केले होते.

**'वादसंवाद' मधील विनोद :** विनोद हा स्वतंत्र स्वयंसिद्ध प्रकार नाही तर ती एक वृत्ती आहे. ज्यांच्यापाशी ती नाही ती त्याने कितीही खटाटोप केला तरी लाभणे कठीण. 'वाद-संवाद' मधील विनोद हा सहजप्रवृत्तीतून आलेला आहे. गहिऱ्या वैचारिक लेखनाआड-पृष्ठभागाआड झरत राहूनं समजदार वाचकाला प्रसन्न करणारा हा विनोद आहे. ग. रा. कामत यांनी मंविंच्या विनोदाला tongue in cheek humour म्हटले होते. विनोदाच्या विविध प्रकारातले उपरोध व कोटी हे तसे मर्यादाशील प्रकार ! पण उपहास या विनोदाच्या प्रकाराला बाष्कळपणा, रासवटपणा, कुत्सितपणा इ. वैशिष्ट्ये चिकटू शकतात. पण उपहास हा सुद्धा किती सूक्ष्म, मार्मिक, गालातल्या गालात हसवणारा खट्याळ असू शकतो हे मंवि यांनी आपल्या 'वाद-संवाद' या सदरातून दाखवून दिले.

❖❖❖

**मंगला देसाई**
ई४, ५/४ भीमाशंकर
सी.एच्.एस्. नेरूळ (पूर्व),
सेक्ट. १९-ए, नवी मुंबई ४००७०६












पुस्तक परिचय

# ‘दलित साहित्य : प्रवाह आणि प्रकार’
# डॉ. अविनाश सांगोलेकर

प्रा. संजय नगरकर

स्वातंत्र्यानंतर मराठी साहित्यात मोठे मन्वंतर घडले. अनेकविध साहित्यप्रवाह जोमाने पुढे आले. त्यांचे जल्लोषी स्वागतही झाले. हा पहिला वहिला जल्लोष हळूहळू स्थिरावला व त्यांच्याविषयी गांभीर्याने चर्चा, समीक्षालेखन होऊ लागले. त्यापैकीच एक साहित्यप्रवाह म्हणजे ‘दलित साहित्य’ होय. १९८० नंतर दलित साहित्याची मांड अधिक परिपक्व झालेली दिसते. प्रारंभीच्या ‘दलित साहित्य आवर्तात सापडले आहे’, ‘दलित साहित्यात तोच-तो-पणा आलेला आहे’, ‘दलित साहित्य ऊरवडवे आहे’ या टीकेच्या मर्यादा पचवून ‘दलित साहित्य’ विचार आज प्रगल्भ झालेला दिसतो. त्यासंदर्भात आस्थेने समीक्षा करणाऱ्या भालचंद्र फडके, गो. म. कुलकर्णी, बाळकृष्ण कवठेकर, या दलितेतर समीक्षकांनी दिलेले योगदानही तितकेच महत्त्वाचे आहे. या समीक्षकांना ‘वाट पुसत पुसत’ दलित साहित्याच्या प्रांताचा धांडोळा घेणाऱ्या डॉ. अविशान सांगोलेकरांचा ‘दलित साहित्य : प्रवाह आणि प्रकार‘ हे पुस्तक प्रतिमा प्रकाशन, पुणे या प्रकाशनसंस्थेने प्रकाशित केलेली समीक्षा आहे. या ग्रंथातून डॉ. सांगोलेकरांचे गेल्या तीस वर्षांपासूनचे चिंतन व दलित साहित्यातील काही अंधारे कोपरे प्रकाशात आणण्याची भूमिका दिसून येते.

‘वाङ्मयीन प्रवाह’, ते निर्माण होण्यामागील कारणे, परंपरा आणि नवता यांचे परस्परसंबंध हे सूत्र घेऊन १९४५ नंतर मराठी साहित्यात निर्माण झालेल्या साहित्यप्रवाहांची चर्चा गोळीबंद पद्धतीने करून, समीक्षक डॉ. सांगोलेकर दलितसाहित्यप्रवाहाच्या दालनात प्रवेश करतात. त्यामुळे ग्रंथाला सूत्रबद्धता प्राप्त होते. पहिल्या भागातील ही चर्चा तात्त्विक स्वरूपाची आहे. त्यानंतर ‘दलित साहित्यप्रवाह’, ‘दलित कवींची गझल’, ‘साहित्य-प्रकारनिष्ठ दलित साहित्यकृती’ असे तीन भाग येतात. अखेरच्या पाचव्या भागात ‘संदर्भग्रंथ सूची’ व डॉ. अविनाश सांगोलेकर : परिचय’ अशी परिशिष्टे दिलेली आहेत. दलित साहित्याच्या अभ्यासकाला एकाच ठिकाणी संदर्भांची व संदर्भग्रंथांची नोंद येथे मिळेल व निश्चितच त्याच्या अभ्यासाला दिशा मिळेल.

‘दलित साहित्य’ या साहित्यप्रवाहाची व संज्ञेची चर्चा आजपर्यंत अनेक साहित्यिकांनी विविध पद्धतीने केलेली दिसते. त्याबाबत अभ्यासकात एकमत दिसत नाही. डॉ. सांगोलेकरांनी या सर्व मतमतांतरांचा आढावा घेत, अखेरीस स्वतःची एक तौलनिक भूमिका मांडली आहे.

❖❖❖

दलित साहित्य : प्रवाह आणि प्रकार
डॉ. अविनाश सांगोलेकर (९८५०६१३६०२)
प्रतिमा प्रकाशन, पुणे (२००९)

प्रा. संजय नगरकर
कै. राधाबाई काळे महिला-महाविद्यालय,
अहमदनगर



अनुक्रमणिका



*पुस्तक–परिचय*

# वऱ्हाडी लोकभाषेचा साक्षेपी वेध

डॉ. सुनंदा देशपांडे

*[ वऱ्हाडी लोकभाषेची ऐतिहासिक, भौगोलिक, सांस्कृतिक श्रीमंती सर्वमान्य आहे. परंतु 'वऱ्हाडी हीच मराठीची जन्मदात्री आहे (?) असा निष्कर्ष काढताना– 'वऱ्हाडी'चा अवास्तव पुरस्कार तर नाही ? ग्रंथ वाचून प्रतिक्रिया कळवाव्यात. –संपादक ]*

डॉ. प्रतिमा इंगोले ह्या वऱ्हाडी साहित्यिक म्हणून आपल्याला सुपरिचित आहेत. वऱ्हाडी बोलीशी नाळ जुळलेल्या या लेखिकेचे 'वऱ्हाडी लोकभाषा' हे पुस्तक म्हणजे त्यांनी अमरावती विद्यापीठाला सादर केलेला प्रबंध. या पुस्तकातील वऱ्हाडी बोलीभाषेच्या संशोधनाचा हा पहिला प्रयत्न असल्याचे त्यांनी म्हटले आहे. मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयातून मिळतील तेवढे संदर्भ अभ्यासून हे पुस्तक सिद्ध झाले असल्याने वऱ्हाडी बोलीच्या अभ्यासकांना ते पायाभरणी म्हणून उपयुक्त ठरेल, असेच त्याचे स्वरूप आहे.

प्रस्तुत प्रबंधाचे क्षेत्र हे संपूर्ण अमरावती विद्यापीठाच्या परिक्षेत्राएवढे असल्याचे त्यांनी सुरुवातीलाच स्पष्ट केले आहे. या प्रबंधातून त्यांनी अमरावती विद्यापीठांतर्गत यवतमाळ, अकोला, वाशीम, अमरावती आणि बुलढाणा या जिल्ह्यातील लोकगीतांचा अभ्यास केला आहे. हे करताना त्यांनी वऱ्हाडच्या इतिहासाचा आणि भूगोलाचाही वस्तुनिष्ठ भूमिकेतून विचार केला आहे. व्याकरणाचा विचार करून वऱ्हाडीच्या विशेषांचा आणि वैशिष्ट्यांचा या अभ्यासातून शोध घेण्याचा त्यांचा प्रयत्न विषयाला न्याय देण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरला आहे. लोकगीतांना आणि लोकभाषेला जास्तीत जास्त प्रमाण मानून लोकगीताच्या आधारे वऱ्हाडी संस्कृतीचा आणि समाजजीवनाचा वेध त्यांनी घेतला आहे. यासाठी संस्कृतचा प्रभाव नाकारूनच लोकसंस्कृतीपर्यंत पोचता येईल; हा त्यांचा विश्वास त्यांना या विषयाच्या मूळापर्यंत घेऊन गेला आहे. हे या पुस्तकातून आपल्याला जाणवल्याशिवाय राहत नाही.

वऱ्हाडीचा भाषाशास्त्रीय अभ्यास करताना त्यांनी पूर्णापट्टीची वऱ्हाडी, सीमावर्ती वऱ्हाडी, मध्यप्रदेशलगतची मराठी, मराठवाड्यालगतची मराठी, खानदेशलगतची मराठी असे मराठी भाषेचे प्रादेशिक भेद कल्पिले आहेत. 'पूर्णा' नदीला वऱ्हाडात एक आगळे महत्त्व आहे. या पूर्णेच्या काठी अकोला, अमरावती, यवतमाळ, बुलढाणा हे चार जिल्हे आहेत. या जिल्ह्यांच्या ठिकाणी एकही मोठे शहर नसल्याने पूर्णानदीच्या काठी खरी ग्रामीण वऱ्हाडी अस्तित्वात आहे. पूर्णापट्टीची वऱ्हाडी ही निखळ वऱ्हाडी मानली जाते. याद्दष्टीने संत गाडगेबाबांच्या पूर्णापट्टीच्या वऱ्हाडीच्या व्याकरणविशेषाचे लेखिकेने केलेले विश्लेषण अभ्यासपूर्ण आहे.

सीमावर्ती वऱ्हाडीचा विचार करताना त्या भागातील वऱ्हाडीवर द्राविडी भाषेचा असलेला प्रभाव लेखिकेने आपल्या निदर्शनास आणून दिला आहे. याचे कारण यवतमाळ जिल्ह्याच्या दक्षिणेकडे आंध्रप्रदेश. वऱ्हाडचा हा भाग आंध्राला लागून असल्याने वऱ्हाडात कोमटी वडार, तेलगू जाती मोठ्या प्रमाणात आढळतात.

मराठवाड्याचा प्रदेश सातवाहनाच्या प्रदेशालगतचा. त्यामुळे सातवाहन संस्कृतीचा प्रभाव इथल्या वऱ्हाडीवर जाणवतो. मराठवाड्यावर काही काळ निजामांनी राज्य केल्यामुळे उर्दू भाषेचा प्रभावही जाणवतो. इथल्या वऱ्हाडीचा ठसकेबाज बाज चटकन् लक्षात येण्यासारखा आहे. पूर्वी वऱ्हाड मध्यप्रदेशाला जोडून असल्याने मध्यप्रदेशातील भाषेचा सर्वाधिक परिणाम मध्यप्रदेशलगतच्या वऱ्हाडीवर झालेला दिसतो. हिंदी माध्यमातून फारशी, अरबी वऱ्हाडीत आलेत. वऱ्हाडीतला 'जी' प्रत्यय हिंदीच्या संपर्कानेच आला आहे. विदर्भाच्या बुलढाण्यालगत खानदेश, त्यामुळे इथे वऱ्हाडी-खानदेशी भाषा प्रचलित आहे. सुविख्यात निसर्ग-कवयित्री बहिणाबाई ही या खानदेशचीच. तिच्या काव्यातील भाषेला 'खानदेशी-वऱ्हाडी' म्हटले गेले आहे पण ती खरी वऱ्हाडीच कशी आहे, हे लेखिकेने निदर्शनास आणून दिले आहे. खानदेशची बोलीभाषा अहिराणी. या अहिराणीचा वऱ्हाडीवर प्रभाव जाणवतो. मात्र खानदेशच्या

विदर्भांतर्गतच्या भागात बोलली जाणारी बोलीभाषा ही वऱ्हाडीच असल्याचे लेखिकेने नोंदवले आहे.

वऱ्हाडीचे हे प्रादेशिक भेद आहेत. ते सांगण्यापूर्वी लेखिकेने वऱ्हाडचा इतिहास, वऱ्हाडी भाषेची प्राचीन परंपरा, मोगली राजवटीचा वऱ्हाडी भाषेवरील परिणाम, वऱ्हाडी भाषेची वैशिष्ट्ये, वऱ्हाडी भाषेचे यादवकालीन स्वरूप, निजामाच्या राजवटीत पडलेला उर्दू, फार्शी, अरबीचा प्रभाव याचे सांगोपांग विवेचन केले आहे. या विवेचनातून वऱ्हाडी हीच मराठी भाषेची जन्मदात्री असल्याचा निष्कर्ष त्यांनी मांडला आहे. पण वऱ्हाडीला मराठीची आज उपभाषा समजली जात असल्याची खंतही त्यांनी बोलून दाखवली आहे. यानंतरच्या प्रकरणात लोकभाषेचा विचार करताना बोली भाषेचे स्वरुप आणि वैशिष्ट्ये, वऱ्हाडचे सांस्कृतिकजीवन, संस्कृतीची जडणघडण, संस्कृती म्हणजे काय, सांस्कृतिक जीवनातील चढउतार अशा विषयाशी संबंधीत गोष्टींचा ऊहापोह केला आहे. सामान्यांचे भावविश्व अभिव्यक्त करणारी समूहमनाची दैनंदिन व्यवहाराची उत्स्फूर्त व प्रवाही बोलभाषा म्हणजेच लोकभाषा अशी लोकभाषेची समर्पक व्याख्या करून लोकभाषा ही लोकसंस्कृतीशी आणि लोकजीवनाशी किती एकरूप झालेली असते; आणि त्यामुळे ती लोकमनाशी कशी भिडते याचे सोदाहरण प्रात्यक्षिक दाखवून आपल्या विषयाला त्यांनी अधिक बळकटी दिली आहे.

लोकगीते ही आपल्या संस्कृतीचे अविभाज्य अंग आहे. लोकगीतातून त्या त्या समाजाचे जीवन, त्यांच्या चालीरीती, सणवार, एकूणच त्यांची संस्कृती कळायला मदत होते. त्यामुळेच वऱ्हाडी संस्कृतीचा आणि समाजजीवनाचा अभ्यास करण्यासाठी लेखिकेने लोकगीतांचा घेतलेला आधार अभ्यासकांना त्यांच्या विषयाच्या अधिक जवळ घेऊन जाणारा ठरला आहे. वऱ्हाडी भाषेला लाभलेली समृद्ध परंपरा, वऱ्हाडी भाषेतील आद्यग्रंथांनी मराठीला दिलेली समृद्धता, वऱ्हाडीचे लोकभाषित्व, वऱ्हाडी भाषेतील लोकसाहित्याची विपुलता आणि इतर भाषांच्या संपर्कात येऊनही वऱ्हाडीने कायम राखलेले आपले स्वत्व अशा बहुविध अंगांनी लेखिकेने घेतलेला विषय-परामर्श वाचकांनाही आपल्याबरोबर घेऊन जातो.

❖❖❖

वऱ्हाडी लोकभाषा : भाषाशास्त्रीय अभ्यास, ले. प्रतिमा इंगोले, सोनल प्रकाशन, दर्यापूर. किंमत - १०० रु.

**डॉ. सुनंदा देशपांडे**
एलएडी महाविद्यालय, नागपूर.

---

(पान क्र. २३ वरून पुढे चालू...)

## नवे आजीव सभासद

९३) शितोळे विजय यशवंतराव, चिंचवड
९४) शहासने चंद्रकांत शांताराम, पुणे
९५) एचवाड (रेड्डी) गणेश उद्धवराव, पुणे
९६) हिर्लेकर श्रीधर वि., पुणे
९७) तुपे सुखदेव पुजावा, माशी बाभुळगाव
९८) शेख मुश्ताक महंमद, पाथर्डी
९९) गोरे भाऊसाहेब मुरलीधर, पाथर्डी
१००) फुंदे बप्पासाहेब गणपत, पाथर्डी
१०१) काळे संदीप नानासाहेब, पाडळी
१०२) खेडकर अशोक भानुदास, पाथर्डी
१०३) डाळींबकर नंदकुमार बापुराव, पाथर्डी
१०४) पारखे विलास वसंतराव, पाथर्डी
१०५) चेमटे सुरेखा काशिनाथ, पाथर्डी
१०६) गाडेकर भारत रामदास, पाथर्डी
१०७) साठे अंबादास गोपीनाथ, डाळवाडी
१०८) शेवाळे वैभव विनोद, पाथर्डी
१०९) मंत्री ओमप्रकाश लक्ष्मीनारायण, पाथर्डी
११०) कोटकर राजेंद्र विश्वनाथ, पाथर्डी
१११) हुमायुन गफूर आतार, पाथर्डी
११२) शिरसाट रामकिसन पाराजी, पिंपळगाव हप्पा
११३) घुले राजकुमार पंढरीनाथ, पाथर्डी
११४) चातुर अनिल बन्सिधर, पाथर्डी
११५) दहिफळे बाबासाहेब विठ्ठल, मोहटे
११६) भोसे योगेश वसंतराव, पाथर्डी
११७) घुले रमेश आसराजी, पाथर्डी
११८) आव्हाड अभय नारायण, पाथर्डी
११९) गुगळे विश्वजीत नयनसुख, पाथर्डी
१२०) रोकडे विष्णू बन्सी, पाथर्डी
१२१) शिंदे अशोक वैजनाथ, पाथर्डी
१२२) सुरवसे सोपान माणिकराव, बीड
१२३) जाधव सुरेश विनायक, कुंभारी
१२४) चन्ने मदत तुकाराम, दुलेचांदगी
१२५) बनकर श्रीकांत अनिल, पुणे
१२६) पाटसकर भाग्यश्री जयंत, पुणे
१२७) देशपांडे गौरी, नागपूर
१२८) खंदारे योगेशाग्रज सुरेखा, सोलापूर
१२९) मकानदार साहेराबेगम सरदार, सोलापूर
१३०) लेंगरे विलास भिवा, सोलापूर
१३१) रणखांबे विवेकानंद अर्जुनराव, पुणे
१३२) रणखांबे मेघना विवेकानंद, पुणे
१३३) नरूसभार पा. , पुणे
१३४) शेंडे जयश्री दादासाहेब, फलटण
१३५) आपटे विक्रम गोविंद, फलटण
१३६) धनवट जयसिंग रामचंद्र, फलटण
१३७) चरेगांवकर दत्तात्रय रामचंद्र, फलटण
१३८) मोदी बापूसाहेब मोतीभाई, फलटण
१३९) इनामदार शरद बाळासाहेब, फलटण
१४०) दाते श्रीनिवास गणेश (रंगा), फलटण
१४१) सस्ते प्रकाश रामचंद्र, फलटण
१४२) बोराटके विजयराव गोविंदराव, फलटण
१४३) वाघमोडे शहाजी शंकर, शहापूर
१४४) कोळी दादासाहेब सर्जेराव, अकलूज
१४५) सोमाणी दीपक बद्रिनारायण, इचलकरंजी
१४६) कांबळे प्रशांतकुमार भुजाल, इचलकरंजी
१४७) सपकाळे वसंत मुरलीधर, इचलकरंजी
१४८) भागवत जगदीश विठ्ठलराव, पाथर्डी

❖❖❖

# म. सा. प. ने गौरविलेले ग्रंथ

- डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी

*[ महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या १०४ व्या वर्धापन दिनानिमित्ताने साहित्याच्या विविध क्षेत्रातील नामवंत ग्रंथांना पारितोषिक देऊन गौरविले गेले. संदर ग्रंथांचा धावता परिचय या लेखामध्ये घेण्यात आला आहे. पारितोषिक प्राप्त लेखकांचे अभिनंदन! –संपादक ]*

१०४ वर्षांची परंपरा असलेल्या महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी वर्धापनदिनाच्या निमित्ताने २६ व २७ मे रोजी वार्षिक ग्रंथ पारितोषिक वितरण समारंभ संपन्न होतो. विविध वाङ्मयप्रकारातील उल्लेखनीय पुस्तकांची दखल घेऊन त्या त्या प्रकारातील उत्कृष्ट पुस्तकास पुरस्कार देण्यात येतात. यासाठी वाङ्मयक्षेत्रातील जाणकारांवर ग्रंथ अथवा ग्रंथकाराची निवड करण्याची अवघड जबाबदारी सोपविण्यात येते. केवळ महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाकडे वर्षभराच्या अवधीत पुरस्कारार्थ भेट आलेले, तसेच ग्रंथालयाने खरेदी केलेले ग्रंथच या पुरस्कारांसाठी विचारात घेतले जातात असे नाही तर, इतरत्र उपलब्ध ग्रंथांचाही त्यात समावेश करण्यात येतो. प्रसंगी त्यासाठी आवर्जून ग्रंथखरेदी करण्यात येते किंवा प्रकाशकाला विशिष्ट ग्रंथ पाठविण्याचे आवाहन करण्यात येते. या सर्व ग्रंथांमधून उत्कृष्ट ग्रंथांची पारितोषिकासाठी निवड करण्यात येते. म्हणूनच महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पुरस्कार प्रतिष्ठेचे समजले जातात. मराठी वाङ्मय लेखनाचा तो मानदंड समजला जातो.

२७ मे हा महाराष्ट्र साहित्य परिषदेचा वर्धापनदिन. या दिवशी 'महाराष्ट्र साहित्य गौरव पुरस्कार' आणि 'डॉ. भीमराव कुलकर्णी' कार्यकर्ता पुरस्कार' हे अत्यंत मानाचे समजलेले दोन पुरस्कार पुरस्कारार्थींना सन्मानपूर्वक प्रदान करण्यात येतात. मराठी भाषेत गुणवत्तापूर्ण लेखन करणाऱ्या व साहित्यक्षेत्रात भरीव कामगिरी केलेल्या व्यक्तीस 'महाराष्ट्र साहित्य गौरव' पुरस्काराने सन्मानित करण्यात येते. बीडच्या कवयित्री डॉ. सुहासिनी इर्लेकर, ज्येष्ठ कवी सुधीर मोघे, लोकप्रिय ललितगद्य लेखक कै. रवींद्र पिंगे अशा मराठीत दीर्घकाळ लेखन केलेल्या व्यक्तींना या पुरस्काराने सन्मानित करण्यात आले आहे. यावर्षी हा पुरस्कार प्रा. विश्वनाथ खैरे यांना देण्यात आला. प्रा. विश्वनाथ खैरे यांना अलिकडेच साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला आहे. प्रा. विश्वनाथ खैरे हे भाषाशास्त्राचे अभ्यासक असून संस्कृत-मराठी-तमीळ या तीन भाषांमधील एकात्मता किंवा अभेद दर्शविणारा सिद्धांत त्यांनी अभ्यासपूर्वक मांडला असून त्यास 'संमत विचार' असे नाव दिले आहे.

डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या नावाने कार्यकर्ता पुरस्कार देताना एखाद्या मराठी साहित्यविषयक संस्थेस प्रयत्नपूर्वक नावारुपास आणलेल्या व्यक्तीचा विचार करण्यात येतो. यावर्षी या पुरस्कारासाठी पुण्याच्या डॉ. मंदा खांडगे यांची निवड करण्यात आली आहे. डॉ. मंदा खांडगे यांनी पुण्यातील 'साहित्यप्रेमी भगिनी मंडळ' या संस्थेच्या कामात तनमनधन झोकून काम केले असून संस्थेच्या कार्यक्षेत्रात लक्षणीय वाढ केली आहे.

या वर्षी २७ मे रोजी पुरस्कार वितरण सोहळा 'मिळून साऱ्याजणी' या मासिकाच्या संपादिका डॉ. विद्या बाळ यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला.

तसेच दि. २६ मे रोजी सुप्रसिद्ध मराठी साहित्यिक ह. मो. मराठी यांच्या अध्यक्षतेखाली अठ्ठावीस पुरस्कारांचे वितरण करण्यात आले. मराठीतील जवळजवळ सर्व प्रमुख वाङ्मयप्रकारातील लेखनाचा याकरिता विचार करण्यात येतो. एवढ्या सर्व वाङ्मयप्रकारांचा पुरस्कारा-करिता विचार करणारी दुसरी संस्था महाराष्ट्रात नाही. तसेच ग्रंथकार पुरस्कारासाठी विविध वाङ्मय प्रकारात दीर्घकाळ लेखन करणाऱ्या ज्येष्ठ साहित्यिकांची निवड करण्यात येते.

राजा फडणीस पुरस्कृत रामाचार्य अवधानी पुरस्कार अहमदनगरचे प्राचार्य डॉ. अनिल सहस्रबुद्धे यांना प्रदान करण्यात आला. डॉ. सहस्रबुद्धे यांचा 'ज्ञानेश्वरीतील साहित्यविचार' हा अभ्यासपूर्ण ग्रंथ प्रकाशित असून समीक्षालेखन, ललित लेखन याबरोबरच आदिवासींमध्ये शैक्षणिक व सामाजिक प्रबोधनात्मक कार्यात त्यांचा उल्लेखनीय सहभाग असतो. तसेच अगस्त्य ऋषींच्या



अनुक्रमणिका



कार्याचा व तत्त्वज्ञानाचाही अभ्यास करून त्याचा कादंबरीमय आविष्कार त्यांनी निर्माण केला. त्यांचे हे योगदान लक्षात घेऊन त्यांना 'रामाचार्य अवधानी' पुरस्काराने गौरविण्यात आले.

**भा. रा. तांबे पुरस्कार** मराठीतील ज्येष्ठ कवी अरुण म्हात्रे (मुंबई) यांना देण्यात आला. म. ना. गोगटे पुरस्कृत गो. रा. परांजपे पुरस्कार, संगमनेर येथील विज्ञान कथा लेखक डॉ. अरुण मांडे यांना, तसेच **श्रीपाद जोशी पुरस्कार** मराठीतील ज्येष्ठ समीक्षक डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर यांना आणि नाटककार **कमलाकर सारंग पुरस्कार** नाट्यलेखक श्री. रत्नाकर मतकरी यांना प्रदान करण्यात आले. हे वार्षिक ग्रंथकार पुरस्कार अत्यंत प्रतिष्ठेचे समजले जातात. त्याकरिता मराठी वाङ्मय क्षेत्रात तोलामोलाचे कार्य असलेल्या व्यक्तींची एकमताने निवड करण्यात आली.

वार्षिक-ग्रंथकार-पुरस्कारासाठी कथा, कादंबरी, ग्रंथसंपादन, इतिहासविषयक लेखन, ललितेतर वैचारिक लेखन, सामाजिक शास्त्रविषयक लेखन, प्रवासवर्णन, आत्मचरित्र, मानसशास्त्र व स्त्रीजीवनविषयक लेखन, बालवाङ्मय, सामाजिक आशयसंपन्न लेखन, प्रबंधलेखन, शिक्षणविषयक लेखन अशा विविध लेखन प्रकारांचा तर विचार करण्यात येतोच, खेरीज लक्षवेधी ग्रंथ पुरस्कार, बालवाङ्मय गद्य व पद्य, संतसाहित्य, तत्त्वज्ञान, उत्कृष्ट ग्रंथ निर्मिती यासाठीही पुरस्कार दिले जातात.




यावर्षी **ह. ना. आपटे पारितोषिक** प्रवीण दशरथ बांदेकर यांच्या 'चाळेगत' या कादंबरीस जाहीर झाले. कोकणच्या पार्श्वभूमीवर रंगवलेले एक वेगळे कथानक हे या कादंबरीचे वैशिष्ट्य आहे. 'चाळेगत' म्हणजे चालगती, कालगती. काळाबरोबर जीवनमूल्ये, सामाजिक मूल्ये बदलतात. माणसाच्या नीतिकल्पना बदलतात. ज्या व्यक्ती जुनी मूल्ये जपू पाहतात, ती बदलत्या मूल्यकल्पनेने बेचैन होतात. पण कोणालाच ही काळगती, व्यक्तीच्या विचारात व पर्यायाने बाह्य वर्तनात होणारा बदल, थोपवता येत नाही हा कादंबरीचा प्रमुख विषयधागा आहे व प्रारंभापासून अखेरपर्यंत संपूर्ण कथानकात हा धागा अनुस्यूत आहे.



राजन खान हे मराठीतील आजचे आघाडीचे लेखक. चिंतनशील लेखन आणि वास्तव समाजजीवनाचे भान ही त्यांची कथालेखनातील वैशिष्ट्ये. 'मनसुवा' या त्यांच्या कथासंग्रहास, या वर्षीचे **आनंदीबाई शिर्के पारितोषिक** देण्यात आले. 'मनसूवा' मध्ये तीन दीर्घकथा असून मानवी मनाच्या गुंतागुंतीचा, मनुष्याचे मन आणि वर्तन याचा शोध घेण्याचा, तीत संगती शोधण्याचा प्रयत्न त्यांनी कथांमधून केला आहे.




शिवाजी विद्यापीठाच्या मराठी विभागातर्फे 'मराठी नाटक आणि रंगभूमी' यावर उद्बोधनवर्गाचे आयोजन करण्यात आले होते. या उद्बोधनवर्गात नाटक आणि रंगभूमी या दोन्ही क्षेत्रातील नामवंतांनी दिलेल्या व्याख्यानांचा समावेश 'मराठी नाटक आणि रंगभूमी' या विश्वनाथ शिंदे आणि हिमांशू स्मार्त यांनी संपादित केलेल्या ग्रंथात आहे. या वर्षीचे म. वि. गोखले पारितोषिक या ग्रंथास देण्यात आले.

**रा. ना. नातू पारितोषिक राजा** तथा डॉ. श्रीधर मधुकर



दीक्षित यांच्या 'एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र-मध्यम-वर्गाचा उदय' या संशोधनात्मक इतिहासग्रंथास देण्यात आला. एकोणिसावे शतक हे भारताच्या इतिहासातील सामाजिक, धार्मिक चळवळीचा, राष्ट्र-वादाचा, स्वातंत्र्यआंदोलनाचा

आणि आधुनिक युगाचा आरंभकाळ मानला जातो. कोणत्याही काळात समाजजीवनाचे प्रतिबिंब म्हणून मध्यमवर्गाकडेच पाहावे लागते. या दृष्टीने पीएच.डी. प्रबंधासाठी केलेले अभ्यासपूर्ण लेखन म्हणून या पुस्तकाचे मोल अधिक आहे.

**सत्यशोधक केशवराव विचारे पारितोषिक**




अंधश्रद्धा निर्मूलनाचे कार्य अथकपणे दीर्घकाळ करणारे आणि अंधश्रद्धेच्या विरोधातील चळवळीचे अध्वर्यु कृतीशील लेखक डॉ. नरेंद्र दाभोळकर यांनी लिहिलेल्या 'विवेकाची पताका घेऊ खांद्यावरी' या ग्रंथास मिळाला. डॉ. दाभोळकरांच्या प्रासंगिक लेखांचा यात समावेश असला तरी विवेकवादाचा आणि वैज्ञानिक दृष्टिकोनाचा पाठपुरावा करून अंधश्रद्धेचे समूळ उच्चाटन करणे कसे अत्यावश्यक आहे; हे लेखकाने तळमळीने प्रतिपादन केले आहे.

वैदर्भीय लेखिका डॉ. प्रतिमा इंगोले यांच्या 'आत्मघाताचे दशक' हे १९९८ ते २००८ या दशकात बहुसंख्येने शेतकऱ्यांनी आत्महत्या केल्या, त्यामागील सत्य उलगडून दाखवणारे व शासनाची निष्क्रियता निर्भीडपणे सिद्ध करणारे पुस्तक असून, या पुस्तकास ललितेतर गद्यास दिले जाणारे **'गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक'** प्राप्त झाले. तसेच ललितेतर वैचारिक वाङ्मयासाठी दिले जाणारे दुसरे **शि. म. परांजपे पारितोषिक** डॉ. राजेंद्र माने यांनी लिहिलेल्या, लोकगीते, भारूड, गोंधळ इत्यादी मौखिक वाङ्मय-प्रकारातून लोकसंस्कृतीचे सशक्त दर्शन घडविणाऱ्या 'लोकसंस्कृतीचा गाभारा' या पुस्तकास देण्यात आले.










सुनील कुंबरे यांनी लिहिलेल्या 'जंगलजिव्हार' या पुस्तकाची **सामाजिक शास्त्राच्या अभिजात पारितोषिकासाठी** निवड करण्यात आली. चंद्रपूर, आणि अन्य परिसरातील आदिवासी नव्हे मूलवासी जगताच्या सामाजिक-सांस्कृतिक-राजकीय चळवळींचा हा अनोखा लेखाजोखा आहे.



'झिम पोरी झिम' ही बालाजी मदन इंगळे यांची ग्रामीण भाषेतील कादंबरी **शंकर पाटील पारितोषिक** प्राप्त ठरली. जना नावाच्या शिक्षण घेण्यासाठी तळमळणाऱ्या आणि विवाहानंतरही अडचणींचे डोंगर पार करीत शिक्षिका होण्याचा ध्यास घेतलेल्या स्त्रीची कथा या कादंबरीत आहे. संपूर्ण ग्रामीण शैलीतील ही कादंबरी जितकी वास्तव तितकीच हृदयस्पर्शी आहे.

मीना प्रभु यांचे 'रोमराज्य' (भाग १ व २) हे प्रवासवर्णनात्मक पुस्तक प्रवास वर्णनासाठी दिल्या जाणाऱ्या **दि. बा. मोकाशी पुरस्कारासाठी** निवडले गेले. हे प्रवासवर्णन केवळ रोमच्या भूभागाचे वर्णन नाही तर इतिहास, कला, माणसांच्या वस्त्या, मानवी विचार व भावना यांचे दर्शन घडवणारे असून लेखिकेने अत्यंत संवेदनशीलतेने कलेले अनुभवसिद्ध लेखन आहे.







उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीसाठी दिले जाणारे नी. स. गोखले पारितोषिक गीतकार जगदीश खेबुडकर यांच्या 'अनमोल काव्यसंग्रह' या पुस्तकास देण्यात आले. हे पुस्तक



अनुक्रमणिका

संस्कृती प्रकाशन, पुणे यांनी प्रकाशित केले.



**डॉ. अ. वा. कुलकर्णी स्मृती पारितोषिकांसाठी** 'पिढीपेस्तर प्यादेमात' या संतोष पवार यांच्या ग्रामीण काव्यसंग्रहाची निवड करण्यात आली, शेतकरी, कुणबी समाजात एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे चालत येणाऱ्या दुःख-यातना स्त्री-जन्माचे भोग, मजुरांच्या व्यथा इत्यादी गावगाड्याचा अस्सल जीवनपट प्रभावी शब्दांत चित्रित करणारी पवार यांची अस्सल ग्रामीण कविता वाचकाला अस्वस्थ व अंतर्मुख करून विचारप्रवण करते.



उत्कृष्ट आत्मचरित्र-लेखनासाठी दिले जाणारे **कीर्तनसंजीवनी पुष्पलता रानडे पुरस्कृत लक्ष्मीबाई टिळक पारितोषिक** '... आणि दोन हात' या डॉ. वि. ना. श्रीखंडे यांच्या आत्म-चरित्रास देण्यात आले. उत्तम सर्जन म्हणून नावलौकिक असलेल्या डॉ. श्रीखंडे यांनी स्वतःच्या कमतरतांवर मात करून वैद्यकीय व क्रीडाक्षेत्रात कर्तृत्व सिद्ध केले. त्यांच्या जीवनसंघर्षाची कथा त्यांनी अलिप्तपणे '... आणि दोन हात' मध्ये लिहिली आहे.

ऐतिहासिक कादंबरीकार **कै. शिवाजी सावंत पुरस्कृत राधाबाई गो. सावंत स्मरणार्थ पुरस्कार** मराठ्यांचे स्वातंत्र्यसमर, तसेच पेशवा पहिला बाजीराव (पूर्वार्ध व उत्तरार्ध) पेशवा पहिला बाजीराव (नानासाहेब) इत्यादी ऐतिहासिक चरित्रांचे लेखक प्रा. शं. श्री. पुराणिक यांना देण्यात आला. श्री. पुराणिक यांची ऐतिहासिक संशोधनात जी अभ्यासू वृत्ती दिसते त्याची दखल हा पुरस्कार देऊन घेण्यात आली, अशीच म.सा.प. ची भावना आहे.

मानसशास्त्र, समाजशास्त्र, स्त्रीजीवनविषयक प्रश्न या विषयातील वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथास दरवर्षी **कमल भागवत व के. पी. भागवत पुरस्कार** देऊन ग्रंथलेखकाचा गौरव करण्यात येतो. यावर्षी जयदेव डोळे लिखित 'खबर' ह्या पुस्तकाची या पुरस्कारासाठी निवड करण्यात आली. तसेच **स. रा. गाडगीळ पुरस्कृत विजया गाडगीळ पुरस्कारासाठी** सुप्रसिद्ध ललितलेखक श्री. रंगनाथ पठारे यांच्या 'भरचौकातील अरण्यरुदन' या वेगळ्या वळणाच्या कादंबरीची निवड करण्यात आली. माणसा-माणसांमध्ये असलेली गुलाम आणि मालक ही वर्गवारी किती भीषण, क्रूर आणि अमानुष आहे हा व्यथित अनुभव देणारी ही कादंबरी विशिष्ट वाङ्मयीन उंची गाठणारी आहे.









बालवाङ्मयातील **कै. वि. वि. बोकील पारितोषिक** (गद्य) स. ह. जोशी यांच्या 'छोट्या-मोठ्या गोष्टी' या गोष्टींच्या पुस्तकास तर 'सांगू का कानात ?' (पद्य) या कविता मेहेंदळे यांच्या बालकाव्य-संग्रहास देण्यात आले.











**कै. अंबादास माडगुळकर स्मृती पारितोषिकासाठी** नागपूर येथील लोकसत्ताचे वार्ताहर

प्रवीण बर्दापूरकर यांच्या 'डायरी' या सामाजिक आशयाच्या लेखसंग्रहाची निवड करण्यात आली. या लेखसंग्रहात पत्रकारितेच्या निमित्ताने त्यांना भेटलेल्या व्यक्ती, आलेल्या अनुभवांचे बदलत्या समाजजीवनाचे, बदलत्या सामाजिक मूल्या-विषयीचे चिंतन आहे.




अरविंद व्यं. गोखले यांच्या 'मंडालेचा राजबंदी' हा लोकमान्य टिळकांच्या जीवना-वरील ग्रंथ लक्षवेधी साहित्य ग्रंथ म्हणून **शरदच्चंद्र मनोहर भालेराव पारितोषिकप्राप्त** ठरला. तर त्याच नावाने दिले जाणारे प्रबंधलेखनाचे पारितोषिक प्रा. चौडप्पा कांबळे लिखित 'दलित आणि ग्रामीण कथासाहित्यातील ग्रामीण सांस्कृतिक पर्यावरणाचा अभ्यास' या प्रबंधास देण्यात आले. पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात सादर करण्यात आलेल्या प्रबंधामधून मराठी विभागाकडून या पारितोषिकासाठी प्रबंधाची निवड करण्यात येते.

माधव मदाने पुरस्कृत **शरश्चंद्र चिरमुले पारितोषिका**-साठी सुप्रसिद्ध लेखिका विनिता ऐनापुरे यांच्या 'स्त्रीदला' या कथा संग्रहाची निवड करण्यात आली. मध्यमवर्गाचे वास्तव चित्रण करणाऱ्या कथा यात आहेत.




डॉ. जनार्दन वाघमारे हे मराठीतील ज्येष्ठ लेखक व विचारवंत आहेत. त्यांना शिक्षणक्षेत्रातील अध्यापनाचा दीर्घकाळ अनुभव आहे. त्यांनी सध्याच्या शिक्षण पद्धतीचा अभ्यास करून, 'बदलते शिक्षण स्वरुप आणि समस्या' हा संशोधनात्मक ग्रंथ सिद्ध केला आहे. **रानजाई प्रतिष्ठान पुरस्कृत ग. ह. पाटील पारितोषिका**साठी या वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथाची निवड करण्यात आली.




परीक्षकांनी परिश्रमपूर्वक, पूर्ण जबाबदारीने व तटस्थवृत्तीने पारितोषिकांसाठी ग्रंथांची निवड केली असून या सर्व पुरस्कार प्राप्त लेखकांचे म. सा. परिषदेतर्फे अभिनंदन व त्यांना पुढील लेखन वाटचालीसाठी शुभेच्छा!

❖❖❖

**डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी**
'भूपती' कॉम्प्लेक्स, ज्ञानप्रबोधिनीजवळ,
सदाशिव पेठ, पुणे ३०





अनुक्रमणिका

## निवडक नवे...

परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी
विशेष उल्लेखनीय ग्रंथांचा
परिचय करून देणारे सदर

**वाटचाल फर्ग्युसनची :**



'वाटचाल फर्ग्युसनची' या ग्रंथाचा पहिला खंड ब्लूबर्ड इंडिया लि., पुणे यांनी प्रकाशित केला आहे. फर्ग्युसन महाविद्यालयाचे माजी प्राचार्य डॉ. वि. मा. बाचल यांच्या अथक परिश्रमातून हा ग्रंथ सिद्ध झाला आहे. फर्ग्युसन महाविद्यालय हे महाराष्ट्रातीलच नव्हे तर देशातील एक नामांकित महाविद्यालय आहे. सलग सव्वाशे वर्षे कार्यरत असणारी ही शैक्षणिक संस्था भारतातील पहिल्या दहा क्रमांकातील एक शैक्षणिक संस्था म्हणून गणली जाते. विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य बाळ गंगाधर टिळक, गोपाळ गणेश आगरकर, महादेव बल्लाळ नामजोशी आणि वामन शिवराम आपटे यांनी २ जानेवारी १८८५ रोजी फर्ग्युसन महाविद्यालयाची स्थापना केली. अर्थकारण, राजकारण, समाजकारण, साहित्य आणि कलाक्षेत्रात असली नाममुद्रा उमटविणारे अनेक कर्तृत्वसंपन्न विद्यार्थी फर्ग्युसनने देशाला दिले. या पहिल्या खंडात १८८५ ते १९३५ हा कालखंड आहे. पूर्वपीठिका, डेक्कन एज्युकेशन सोसायटीची घटना, फर्ग्युसनचा शुभारंभ, आपत्तीचे दशक, फर्ग्युसनचा नवा अध्याय (रँगलर परांजपे कालखंड), वादळातून सुवर्ण महोत्सवाकडे, फर्ग्युसनचे शिक्षण-सेवक, माजी विद्यार्थ्यांच्या आठवणी अशी सात प्रकरणे या पहिल्या खंडात आहेत. सुवर्ण महोत्सव ते शताब्दी (१९३५-१९८५) शताब्दी ते शतकोत्तर रौप्यमहोत्सव ते शताब्दी (१८९५-२०१०) हा कालखंड पुढच्या खंडात येणार आहे. फर्ग्युसन महाविद्यालयाच्या वाटचालीचा इतिहास हा केवळ त्या महाविद्यालयाचा इतिहास नाही; तर तो एका मोठ्या काळाचा इतिहास आहे. शैक्षणिक, सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक क्षेत्रात महाराष्ट्रात आणि देश पातळीवर होत गेलेल्या स्थित्यंतराचा हा इतिहास आहे. डॉ. वि. मा. बाचल यांनी कष्टपूर्वक हा महत्त्वपूर्ण ग्रंथ सिद्ध केलेला आहे. या महत्त्वपूर्ण कामाबद्दल पुढच्या अनेक पिढ्या त्यांच्या ऋणात राहतील. ('वाटचाल फर्ग्युसनची' खंड पहिला (१८८५-१९३५). लेखक डॉ. वि. मा. बाचल, प्रकाशक - ब्लूबर्ड इंडिया लि., पुणे पृष्ठे २८८ किंमत ३०० रु.)

**माझ्या गजला :**



सोलापूरचे बदिउज्जमा बिराजदार हे महाराष्ट्रातील नामवंत गझलकार आहेत. संस्कृतचे महापंडित गुलाम दस्तगीर बिराजदार हे त्यांचे वडील आहेत. प्रतिमा आणि संस्कार यांच्यातून बदिउज्जमाची गझल बहरली आहे. समाजातील माणसांच्या व्यथा आणि आधुनिक माणसांचा संघर्ष, सुखदुःखांची कहाणी या गझलसंग्रहात आहे.

साबिर शोलापुरी या नावाने गझललेखन करणारे बदिउज्जमा यांची सहिष्णुवृत्ती त्यांच्या रचनेतील अनेक शेरांतून दृष्टीस पडते. त्यांचा गझलांचा गौरव करताना प्रस्तावनेत डॉ. राम पंडित लिहितात ''मराठी गझल हिंदीमार्फत दाखल न होता सरळ उर्दूच्या वाटेने मराठीत आली पण उर्दूचा प्रभाव न घेता मराठमोळ्या रुपातच घडत गेली. या गझलच्या प्रवासात महाराष्ट्रातील मुस्लीम मराठी साहित्यिकांचे योगदान लक्षणीय आहे. खाबर, इलाही जमादार, ए. के. शेख, खलील मोमीन, अजीम नदाफ, जहीर शेख, मुबारक शेख, फातेमा मुजावर, इकबाल मित्रे, मजहर, बदिउज्जमा बिराजदार ही काही महत्त्वपूर्ण नावे.

जेव्हा प्रबुद्ध माणसांच्या सामाजिक, राजनैतिक जाणिवा प्रगल्भ असतात, जेव्हा ते स्वतः निःस्पृह असतात. तेव्हाच आपल्या रचनाकृतीतून ते समाजातील वैगुण्यावर सडेतोड टीका करण्याचे धारिष्ट्य दाखवू शकतात. बिराजदारांची मनोरचना सामाजिक बांधिलकी मानणारी आहे. त्यांची प्रेमाची व्याख्या व्यापक आहे. सकृतदर्शनी भौतिक ! मात्र अंतरंगात पारलौकिक तत्त्व असा त्यांच्या शेरांचा बाज आहे.'' (माझ्या गजला-बदीउज्जमा बिराजदार (साबिर शोलापुरी) सुविद्या प्रकाशन सोलापूर, पृष्ठे ६१, किंमत ६० रु.)

**मेंदूतला माणूस :**




माणसं अशी का वागतात ? हा अनेकदा आपल्या चिंतनाचा विषय असतो. अनाकलनीय, विचित्रपणे वागणारी माणसे हा कुतूहलाचा विषय असतो. या संदर्भात आज नवेनवे संशोधन होताना दिसते. त्यातील काही संशोधन वाचकांपर्यंत पोचविण्यासाठी डॉ. आनंद जोशी आणि सुबोध जावडेकर यांनी ''मेंदूतला माणूस'' हे पुस्तक लिहिले आहे.

''हे पुस्तक माणसातल्या मेंदूवरचं नाही. मेंदूतल्या माणसावरचं आहे ! मेंदूचं कार्य कसं चालतं हे सांगण्यासाठी आम्ही हे पुस्तक लिहिलेलं नाही. माणसांच्या मेंदूची रचना कशी असते हे सांगणं हा तर मुळी आमचा उद्देशच नाही. माणसाची विचार करण्याची पद्धती समजून घ्यावी, मज्जासंस्थेच्या रचनेमुळे, मेंदूच्या काम करायच्या वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीमुळे माणसाच्या वागण्याच्या संदर्भातले काही धागेदारे हाती येतात का ते पहावं, वरवर विचित्र वाटणाऱ्या वर्तणुकीमागचा कार्यकारण भाव जाणून घ्यायचा प्रयत्न करावा, हा आमचा हेतू आहे'' अशी भूमिका लेखक द्वयींनी मनोगतात व्यक्त केलेली आहे.

जवळजवळ तीस महत्त्वपूर्ण प्रकरणांच्या माध्यमातून मेंदूतला माणूस समजावून सांगण्याचा प्रयत्न लेखकांनी केला आहे. माणसातल्या माणूसपणाचा शोध घेणारे हे पुस्तक चोखंदळ आणि जिज्ञासू वाचकांना भावेल असेच आहे. (मेंदूतला माणूस-डॉ. आनंद जोशी आणि सुबोध जावडेकर, राजहंस प्रकाशन प्रा. लि. पुणे, पृष्ठे २३४, किंमत २२५ रु.)

**सिमरन :**

'सिमरन' (Life without Regrets) हे दिवाकर कारखानीस यांचं पुस्तक म्हणजे त्यांनी आपली लाडकी पणती सिमरन हिला लिहिलेल्या पत्रांचे संकलन आहे. दिवाकर कारखानीस ४०-४२ वर्षांहून अधिक काळ अमेरिकेत वास्तव्याला आहेत. साता समुद्रापार राहूनही त्यांची इथल्या संस्कृतीशी असणारी आपली नाळ तुटू दिली नाही. त्यांच्या आयुष्यातील घटना आणि अनुभवांवर आधारित केलेले सिंहावलोकन या पुस्तकात आहे. हे आत्मचरित्र नाही किंवा आत्मकथनही नाही. आपलं कूळ आणि मूळ शोधणाऱ्या जिज्ञासेतून हे पुस्तक निर्माण झाले आहे. परदेशात वाढणाऱ्या तिसऱ्या अगर चौथ्या पिढीला हे पुस्तक वाचून आपली मुळं शोधण्याची उत्सुकता निर्माण व्हावी; अशा पद्धतीने हे पुस्तक लिहिले आहे. श्री. कारखानीस यांनी आपल्या नातीला ही पत्रं लिहिली असली तरी ती तमाम तरुणाईला आणि इतर व्यक्तींनासुद्धा दीपस्तंभ ठरावीत इतकी सकस आणि दमदार आहेत. कथाकार सुनिता नागपूरकर यांची प्रस्तावना या पुस्तकाला लाभली आहे. (सिमरन लेखक - दिवाकर कारखानीस, तरंग प्रकाशन औरंगाबाद, पृष्ठे २००, किंमत १८० रु.)




**कार्यकर्ता :**

गेल्या शंभर वर्षात जेवढे बदल झाले नाहीत तेवढे या दहा वर्षात घडले. हे बदल सर्व स्तरावर घडले. या बदलांचे पडसाद समाजकारण, अर्थकारण आणि राजकारण यासह अनेक क्षेत्रातही उमटले. मूल्यव्यवस्था बदलली. आदर्शांच्या




संकल्पना बदलल्या. या स्थित्यंतराचा वेध घेणाऱ्या कथा भालचंद्र देशपांडे यांच्या ''कार्यकर्ता'' या कथासंग्रहात आहेत. या कथासंग्रहात एकूण तेरा कथा आहेत. त्यातील पाच कथा राजकारणातील कार्यकर्त्यांच्या मानसिकतेचा आणि वर्तनाचा वेध घेणाऱ्या आहेत. आजचे शिक्षणक्षेत्र गर्तेत सापडले आहे. शिक्षण क्षेत्रातील अनागोंदीकडे लक्ष वेधणाऱ्या आणि वाचकांना अंतर्मुख करणाऱ्या तीन कथा या कथासंग्रहात आहे. कथाकार भालचंद्र देशपांडे हाडाचे पत्रकार आहेत. त्यांना जवळून समाजदर्शन घडलेले आहे. त्यांची निरीक्षणे सूक्ष्म आहेत. मुख्य म्हणजे सच्ची आहेत. त्यामुळेच वास्तवाचा हात धरून फुललेले कथाबीज वाचकांना गुंतवून टाकते. या कथा महाराष्ट्र टाइम्स, अनुष्टुभ, सत्याग्रही लोकसत्ता, आभार प्रतिष्ठातून प्रसिद्ध झालेल्या आहेत. सकस कथाबीज, मानवी स्वभावाचे आणि जीवनव्यवहाराचे सूक्ष्म विच्छेदन आणि प्रवाही भाषा यामुळे अभिजात असे काही वाचल्याचा आनंद वाचकांना मिळतो. (कार्यकर्ता- भालचंद्र देशपांडे, रजत प्रकाशन औरंगाबाद, पृष्ठे १७५, किंमत १६० रु.)

**ओले अथांग श्वास :**



'ओले अथांग श्वास' हा रामकली पावसकर यांचा दीर्घकविता संग्रह आहे. श्रीरामपूरच्या शब्दालय प्रकाशनाने तो प्रकाशित केला आहे. त्यानंतर काही, रस्ते-काही संदर्भ,तू... मी.. सूर्य आणि समुद्र, ती, पोरी झऱ्यावर, पाऊस तिचा, गच्च नीरव वेट या शीर्षकाच्या दीर्घ कविता या संग्रहात आहेत. एका विषयाच्या अनुषंगाने आलेल्या वेगवेगळ्या कविता या संग्रहात भेटतात. या कवितांना गावकवी, प्रतिष्ठान, कवितारती, शब्दालय, परिवर्तनाचा वाटसरू, दक्षिण महाराष्ट्र साहित्य पत्रिका, मिळून साऱ्याजणी, साप्ताहिक सकाळ, लोकमत मधून पूर्वप्रसिद्धी मिळालेली आहे. अतिशय चिंतनशील आणि आशयगर्भ अशा या कविता आहेत. श्वासाची अथांगता आणि जीवनाचा तळ शोधण्याच्या सर्जक वृत्तीतून फुललेली ही कविता आपले वेगळेपण सिद्ध करणारी आहे. (ओले अथांग श्वास- रामकली पावसकर- शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे १०४, किंमत १०० रु.)

**सुहास शिरवळकर : असे आणि तसे :**




मराठी साहित्यात तरुण पिढीची नेमकी स्पंदने टिपणाऱ्या प्रवाहाचे मुख्य प्रतिनिधी म्हणून सुहास शिरवळकर यांची मोहिनी अद्याप कायम आहे. त्यांची 'दुनियादारी' आजच्या युवा पिढीवरही अधिराज्य गाजवते आहे. तब्बल ७२ कादंबऱ्या. कथासंग्रह, रहस्यकथा, बालवाङ्मय, एकांकिका, चित्रपट, दूरदर्शन मालिकांसाठी लेखन अशी विपुल ग्रंथसंपदा निर्माण करणाऱ्या शिरवळकरांचा चाहतावर्ग, मित्रवर्गही मोठा होता. त्यांच्या निधनानंतर त्यांचे बहुरंगी व्यक्तिमत्त्व, माणूसपण आणि त्यांची साहित्यिक कारकीर्द यांचे समग्र आणि वस्तुनिष्ठ चित्रण म्हणजे हे पुस्तक, असे म्हणावे लागेल. अनिल किणीकर यांनी संपादित केलेल्या या पुस्तकात शिरवळकरांचे विविध पैलू टिपणारे त्यांच्या आप्तजनांनी लिहिलेले लेख अत्यंत हृदयस्पर्शी आणि मायेने ओथंबलेले आहेत. पण त्याचबरोबर त्यांची साहित्यिक आणि माणूस म्हणूनही उंची त्यातून प्रतीत होते. ६९ जणांचे लेख यात असून लेख समाविष्ट न झालेल्या १८ जणांची यादी त्यामध्ये दिली आहे. संवेदनशील लेखक, जिंदादिल कलाकार, कलंदर मुशाफिर, सुशिकाका, पिढ्यापिढ्यांचा लेखक, त्यांचे झपाटलेपण, संपादक सुशि असे शिरवळकरांचे भावलेले पैलू त्यातून स्पष्ट होतात. त्याचप्रमाणे म. द. हातकणंगलेकर यांचा लोकप्रिय कादंबरी, वसंत आबाजी डहाके यांचा रहस्यकथेचा रूपबंध असे अभ्यासपूर्ण लेखही यामध्ये आहेत. इतर लेखकांमध्ये राजन

खान, डॉ. अश्विनी धोंगडे, डॉ. आनंद यादव, ह. मो. मराठे, रविमुकुल, एन्. चंद्रा. अलका कुबल-आठल्ये, अजित सातभाई, प्रकाश देवळे, मंगेश वाघमारे आदी विविध क्षेत्रातल्या मान्यवरांचा समावेश आहे. या साऱ्यांच्या लेखनातून उलगडणारे शिरवळकरांचे व्यक्तिमत्त्व अत्यंत दिलदार, पारदर्शी आणि निखळ माणूसपण जपणारे आहे. म्हणूनच ते अधिक भावते आणि शिरवळकर आपल्यात नाहीत, ही गोष्ट पुन्हापुन्हा खोटी वाटायला लागते. (सुहास शिरवळकर : असे आणि तसे, संपादक-अनिल किणीकर, शशिदीप प्रकाशन, पृष्ठे - ३०, किंमत - २००)

**तिमिरातुनी तेजाकडे :**



गेल्या पाव शतकाहून अधिक काळ अंधश्रद्धा निर्मूलनाची चळवळ हिरीरीने महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात पोहोचविणाऱ्या डॉ. नरेंद्र दाभोळकर यांनी या विषयाबावत समग्र चिंतन करणारे हे पुस्तक लिहिले आहे. अंधश्रद्धा निर्मूलन, वैज्ञानिक दृष्टिकोन, विवेकवाद या विषयांचा पाठपुरावा लेखकाने अधिक वर्षे अनेक माध्यमांमधून केला आहे. मात्र या चळवळीकडे अभ्यासूवृत्तीने पाहणाऱ्या व्यक्तींना या विषयाची एकसंध सम्यक मांडणी उपलब्ध नव्हती. ती स्पष्ट करण्याचा प्रयत्न या लेखनाद्वारे करण्यात आला आहे. पुस्तकाचे विचार, आचार आणि सिद्धान्त असे तीन भाग करण्यात आले आहेत. पहिल्या भागात वैज्ञानिक दृष्टिकोनाबरोबरच संमोहन, भानामती, बुवाबाजी अशा प्रकारांबाबतही लिहिले आहे. दुसरा विभाग या सर्व प्रकारांच्या विरोधात समितीने दिलेल्या कृतिशील झुंजीचे वर्णन करणारा आहे. तिसरा विभाग सैद्धांतिक असून अंधश्रद्धा निर्मूलनाच्या विषयाशी संबंधित जे विषय नेहमी चर्चिले जातात, त्यांची मांडणी यामध्ये केली आहे. त्यामुळे अंधश्रद्धा निर्मूलनाशी संबंधित सर्व विषयांची अभ्यासपूर्ण, सखोल मांडणी आणि त्याला असलेली परिणामकारक कृतिशीलतेची जोड यामुळे हे पुस्तक प्रत्ययकारी ठरले आहे. युगानुयुगे चालत आलेल्या अंधश्रद्धेच्या तिमिराचा भेद करून तेजाप्रत वाटचाल सुरू करण्याचा विश्वास हे पुस्तक वाचकांमध्ये निर्माण करेल. (तिमिरातुनी तेजाकडे : लेखक - डॉ. नरेंद्र दाभोळकर : राजहंस प्रकाशन प्रा. लि. पुणे, पृष्ठे - ४७१, किंमत : ४०० रुपये)

**पांढर :**




कथा, कादंबरी, ललित, समीक्षा असे चौफर लेखन करणाऱ्यया रवींद्र शोभणे यांची ही आठवी कादंबरी. आपल्या जन्मभूमीत - खरसोली इथे भेटलेली माणसे. बदलत्या काळात अवघड होत जाणारे त्यांचे जगणे, गावाचा बदलत जाणारा, अधिक भेसूर होणारा चेहरामोहरा असे अनेक लेखकाच्या भावविश्वाशी जोडले गेलेले संदर्भ घेऊन ही कादंबरी येते. दुष्काळ हा 'पांढर'चा केंद्रबिंदू. जागतिकीकरणाच्या रेट्याची झळ एकविसाव्या शतकाच्या प्रारंभी सर्वप्रथम बसली ती कृषिव्यवस्थेला. गावगाड्याच्या नैसर्गिक जीवनाचा त्यामुळे विनाश झाला. अर्थव्यवस्था कोलमडली. शेतकऱ्यांचे जगणे कठीण झाले; तसे जमिनीचे कसदारपणही हळूहळू हरवायला लागले. सधन असलेली गावखेडी एकविसाव्या शतकात निर्धन होऊन मरणपंथाला लागल्याचे चित्र आज दिसते आहे. या अस्वस्थ करणाऱ्या वास्तवाचा दाहक अनुभव 'पांढर' मधून जोरकसपणे व्यक्त होतो; आणि वाचकालाही सुन्न करून जातो. (पांढर - लेखक - रवींद्र शोभणे, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, पृष्ठे - ३४०, किंमत - ३०० रुपये)

**गाथा पर्यावरणाची :**

पर्यावरण आणि त्याच्याशी संबंधित अनेक बाबींचा उहापोह करणारे हे पुस्तक म्हणजे 'लोकसत्ता' मधील 'गाथा ज्ञानाची' या सदरामधील लेखांचे संकलन आहे. पर्यावरण हा आज परवलीचा शब्द बनला असला तरी सर्वसामान्य माणसांमध्ये त्याविषयी पाहिजे तितकी जागृती झालेली नाही. याचसाठी सामान्य वाचकालाही उमगतील अशा शब्दात




आणि रंजकपणे अनेक विषय मांडण्याचा प्रयत्न यामध्ये लेखकाने केला आहे. पर्यावरण म्हणजे काय इथपासून जैवविविधता, परिसंस्था, ऊर्जा, निसर्गातील घटक, प्रत्येक जीवाचे सृष्टिचक्रातील स्थान, नद्यांची-समुद्रांची स्थिती, धरणांची गरज, कचऱ्याचा प्रश्न, वाढते प्लॅस्टिक, प्रदूषणाची समस्या अशा अनेक विषयांवरचे शंभर लेख या पुस्तकात आहेत. पुस्तकाची भाषा अतिशय साधी-सोपी आहे. अनेक महत्त्वपूर्ण संदर्भही देण्यात आले आहेत. त्यामुळे पर्यावरणाची पूर्वपीठिका असलेल्या आणि नसलेल्याही सर्वांसाठी उपयुक्त आणि वाचनीय ठरावे, असे हे पुस्तक आहे. (गाथा पर्यावरणाची - लेखक - अभिजित घोरपडे, राजहंस प्रकाशन प्रा. लि. पुणे, पृष्ठे - २०८, मूल्य - २०० रुपये)

**मौखिक वाङ्मयाची परंपरा : स्वरूप आणि भवितव्य :**




समाजात रूढ असलेल्या लोकवाङ्मयाच्या किंवा मौखिक वाङ्मयाच्या प्रवाहातून समाजाचे सामूहिक जीवन आणि मानस व्यक्त होते. समाजाच्या जीवनदृष्टीचे आणि जीवनरीतींचे दर्शनही त्यातून घडते. हे लक्षात घेऊन या ग्रंथात लेखक डॉ. प्रभाकर मांडे यांनी मौखिक परंपरेने चालत आलेल्या गेय, लयबद्ध वाङ्मयप्रकारांचा उहापोह केला आहे. मौखिक वाङ्मयाच्या स्वरूप लक्षणांचीही चर्चा केली आहे. परंपरेने चालत आलेलले संकेत, वर्णनांचे-रचनांचे बंध, मौखिक वाङ्मय परंपरेत भविष्य सांगण्याचे ढंग असलेली कथने, गद्यातील उखाणे, म्हणी यांचाही अंतर्भाव यामध्ये आहे. बदलत्या काळात बदलत्या जीवनशैलीमुळे मौखिक वाङ्मयाचे काही प्रवाह खंडित होत आहेत. काही अस्तंगत तर काही कालबाह्यही होत आहेत. काहींच्या स्वरूपात बदल झाले आहेत. तर काहींचे व्यावसायीकरणही झाले आहे. या सर्व बाबींची दखल प्रस्तुत ग्रंथात घेण्यात आली आहे. पारंपरिक श्रमगीते, ओवी, बालगीते, बडबडगीते, विधिगीते, स्त्रियांची खेळगाणी, पारंपरिक दिनक्रम, धनगरांची गाणी अशी एकोणीस वैविध्यपूर्ण प्रकरणे यात आहेत. (मौखिक वाङ्मयाची परंपरा : स्वरूप आणि भवितव्य - लेखक - प्रभाकर मांडे, गोदावरी प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे - ६२२, मूल्य - ६०० रुपये)

❖❖❖

**प्रा. मिलिंद जोशी, स्वाती महाळंक**

❖❖❖

## देणगीदार – १ मार्च २०१० ते मे २०१०

| क्र. | दिनांक | नाव | रक्कम | |
|---|---|---|---|---|
| १) | ९-३-२०१० | श्रीमती पद्मजा वि. भुर्के | १,००१/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| २) | २२-३-२०१० | जोगळेकर कुलवृत्तांत समिती | १०,०००/- | डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृतिदिनासाठी देणगी |
| ३) | २४-३-२०१० | सौ. अश्विनी चितळे (कै. शरयु वासुदेव रानडे यांच्या स्मरणार्थ) | १,१००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ४) | २९-३-२०१० | बर्वे चॅरिटेबल ट्रस्ट (बळवंत शंकर बर्वे) | १५,०००/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ५) | ४-५-२०१० | ललिता भावे | ५,०००/- | ग्रंथालय पारितोषिकासाठी देणगी |
| ६) | १५-५-२०१० | वैदिक संशोधन, पुणे | १,१५०/- | ग्रंथालयासाठी देणगी |
| ७) | २६-५-२०१० | श्रीमती प्रतिभा पु. लिमये | १,०००/- | साहित्य पत्रिकेसाठी देणगी |
| | (१३-९-२००९ | पां. के. दातार | १००१/- | ग्रंथालयासाठी देणगी) |

❖❖❖

# कार्यवृत्त (१ मार्च २०१० ते ३१ मे २०१०)

डॉ. माधवी वैद्य, प्रमुख कार्यवाह

**१४ मार्च २०१० : थोर कवी विंदा करंदीकर यांना श्रद्धांजली :**

पुण्यभूषण फौंडेशन व म. सा. परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने स. प. महाविद्यालयाच्या प्रस्तावित संमेलन स्थळी आजच निधन पावलेल्या कविवर्य विंदा करंदीकर यांना श्रद्धांजली वाहण्यात आली. डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. सतीश देसाई, प्रा. मिलिंद जोशी, रामदास फुटाणे यांनी श्रद्धांजलीपर आपले विचार प्रकट केले.

**दि. १० एप्रिल २०१० : ज्ञानकोशकार केतकर स्मृतिदिन :**

पुण्यातील कमला नेहरू उद्यान येथील केतकरांच्या समाधीला हार, फुले वाहून व पेढे वाटप करून त्यांच्या पुण्यस्मृतीस दरवर्षीप्रमाणे अभिवादन करण्यात आले. तत्पूर्वी सकाळी ८ वाजता केतकरांचे समाधिस्थल पाण्याने धुऊन स्वच्छ करण्यात आले. याप्रसंगी परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे, प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य, कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे, कार्यवाह नंदा सुर्वे, डॉ. कल्याणी दिवेकर, ग्रंथालय प्रमुख अनंत जोशी, दीपक करंदीकर, व कार्यालयीन सेवक वर्ग आणि नागरिक बहुसंख्येने उपस्थित होते.

**दि. २० एप्रिल २०१० : कै. सोनोपंत तथा कै. मामासाहेब दांडेकर स्मृतिपुरस्कारार्थ देणगी प्रदान समारंभ :**

परिषदेचे कार्याध्यक्ष पद सांभाळलेले डॉ. म.वि. गोखले यांनी कै. मामासाहेब दांडेकर यांच्या नावाने दरवर्षी 'संत साहित्य आणि तत्त्वज्ञान' या विषयावरील ग्रंथाला पुरस्कार देण्यासाठी सर्वांत मोठी म्हणजे रुपये २ लक्षची देणगी प्रदान करण्याचा सोहळा झाला. या देणगीतून रु. १०,०००/- चा पुरस्कार दरवर्षी दिला जाणार आहे. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. दरवर्षी ९ जुलै रोजी हा पुरस्कार योग्य व्यक्तीला प्रदान करण्यात येईल. डॉ. गोखले यांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे यांनी सूत्रसंचालन केले. डॉ. गोखले यांच्या वतीने 'विश्वस्त' राजा फडणीस, यांच्या हस्ते गायत्री जोशी, अरुण पारगांवकर, दिलीप महाजन, मिलिंद परांजपे या प्रकाशकांचा पुष्पगुच्छ व शाल देऊन सत्कार करण्यात आला. शेवटी डॉ. म. वि. गोखले आणि डॉ. कल्याणी दिवेकर यांनीही मनोगत व्यक्त केले.

**दि. २१ एप्रिल २०१० : कै. बाळ गाडगीळ व प्रा. म. वि. राजाध्यक्ष श्रद्धांजली सभा :**

प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. अध्यक्षस्थानी प्रा. द. मा. मिरासदार होते. डॉ. शां. ब. मुजुमदार, कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे, एम. के. बापट, सौ. ललिता बापट, श्रीमती देवरुखकर, सुनील गाडगीळ, श्री. सुरेश नातू, यांनी श्रद्धांजली वाहिली. राणी पारसनीस यांनी शेजवलकरांचा संदेश वाचून दाखविले. बाळ गाडगीळ यांच्या चिरंजीवांनी गाडगीळांच्या पुस्तकांचे संच मसाप, पॉप्युलर बुक हाऊस, स्पृहा वाचनालय, पुणे नगर वाचन मंदिर यांना भेट दिले. नंतर राणी पारसनीस यांनी गाडगीळांच्या 'वळचणीचे पाणी' या पुस्तकातील काही अंश वाचून दाखविला. प्रा. द. मा. मिरासदार यांनी अध्यक्षीय समारोप केला. उपस्थितांना दोन मिनिटे उभे राहून श्रद्धांजली अर्पण केली.

**दि. २८ एप्रिल २०१० : कै. कमांडर म. के. लेले स्मृतिव्याख्यान :**

प्रा. पद्माकर पुंडे यांचे 'शेक्सपिअर' या विषयावर व्याख्यान झाले. या प्रसंगी प्रा. पद्माकर पुंडे यांनी शेक्सपियरच्या नाटकातील व्यक्तिरेखा, संवाद यांचे मर्मग्राही विवेचन करून श्रोत्यांना मंत्रमुग्ध केले. या प्रसंगी डॉ. वि. वि. घाणेकर, प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य प्रभृती उपस्थित होते.

**दि. ५ मे २०१० : ज्येष्ठ इतिहाससंशोधक शं. ना. जोशी पुरस्कार वितरण समारंभ :**

स्वागत व सूत्रसंचालन स्वाती महाळंक यांनी केले. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. अध्यक्ष डॉ. विजय देव यांचा परिचय नंदा सुर्वे यांनी करून दिला. डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या हस्ते ज्ञानेश्वरीची प्रत

देऊन अध्यक्षांचा सत्कार करण्यात आला. परिषदेच्या प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते परीक्षक डॉ. सदाशिव शिवदे व डॉ. माधवी खरात यांचा सत्कार करण्यात आला. या दोन्ही परीक्षकांनी आपापले मनोगत व्यक्त केले. पुरस्कार विजेते डॉ. सुधाकर देशमुख (उदगीर) यांचा परिचय कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे यांनी करून दिला. यानंतर 'राष्ट्र आणि राष्ट्रवाद : संकल्पना आणि विकास' या पुस्तकाचे लेखक डॉ. सुधाकर देशमुख यांना शं. ना. जोशी पुरस्कार समारंभाचे अध्यक्ष डॉ. विजय देव यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. याचवेळी पद्मगंधा प्रकाशनाचे श्री. अरुण जाखडे यांचा अध्यक्ष डॉ. विजय देव यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. तसेच कै. शं. ना. जोशी यांच्या कुटुंबियांपैकी श्री. व. शं. जोशी व श्री. म. शं. जोशी यांचाही सत्कार करण्यात आला. पुरस्कार विजेते डॉ. सुधाकर देशमुख यांनी आपले विचार प्रकट केले. अध्यक्षीय समारोप डॉ. विजय देव यांनी आपले विचार प्रकट करून केला. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**दि. १२ मे २०१० : कॉन्टिनेन्टल पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक वितरण समारंभ :**

प्रसिद्ध विनोदी स्तंभलेखक तंबी दुराई ऊर्फ श्रीकांत बोजेवार यांना कॉन्टिनेंटल पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पुरस्कार ज्येष्ठ विनोदी लेखिका सौ. मंगला गोडबोले यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. स्वागत व सूत्रसंचालन कार्यवाह स्वाती महाळंक यांनी केले. प्रास्ताविक डॉ. वि. भा. देशपांडे यांनी केले. अध्यक्ष, पुरस्कार विजेते व परीक्षक यांचे स्वागतपर सत्कार डॉ. वि. भा. देशपांडे व श्री. ह. ल. निपुणगे यांनी केले. तंबी दुराई ऊर्फ श्रीकांत बोजोवार यांचा परिचय प्रा. मिलिंद जोशी यांनी करून दिला. पद्मगंधा प्रकाशनाचे श्री. अरुण जाखडे यांचा परिचय श्री. ह. ल. निपुणगे यांनी करून दिला. परीक्षक मकरंद टिल्लू यांनी मनोगत मांडले. श्री. श्रीकांत बोजेवार यांनी पारितोथिक स्वीकारल्यावर या निमित्ताने आपले मनोगत मांडले. अध्यक्ष सौ. मंगला गोडबोले यांनी समारोपाचे भाषण केले. दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**दि. २० मे २०१० : वैज्ञानिक कथाकथनाचा कार्यक्रम :**

मराठी विज्ञान परिषद व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने वैज्ञानिक कथाकथनाचा कार्यक्रम 'चांदेऱ्यांच्या कथा' असा झाला. प्रा. विनय र. र. यांनी प्रास्ताविक केले. सौ. कविता भालेराव यांनी सूत्रसंचालन केले. अध्यक्षस्थानी सुबोध जावडेकर होते. महेंद्र मुंजाळ यांनी त्यांचा परिचय करून दिला व आभार मानले. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी अध्यक्षांना ज्ञानेश्वरीची प्रत भेट दिली. सर्व विज्ञान कथाकारांना प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते 'कॅडबरी' भेट देण्यात आली. यशश्री पुणेकर, श्री. माडगूळकर, श्रीकांत जगताप, वैष्णवी निमसरकर, मेघना परांजपे यांनी विज्ञानकथांचे कथन केले.

**दि. २२ मे २०१० : कवी यशवंत पुरस्कार वितरण समारंभ :**

स्वाती महाळंक व नंदा सुर्वे यांनी माधव पवार व कवी यशवंत यांच्या निवडक कवितांचे वाचन केले. स्वागत व सूत्रसंचालन स्वाती महाळंक यांनी केले. प्रमुख कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी अध्यक्ष आसावरी काकडे यांचा परिचय करून दिला. तुकाराम गाथेची, डॉ. वि. भा. देशपांडे यांच्या हस्ते सौ. काकडे यांना भेट देण्यात आली. कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे यांच्या हस्ते पेंढारकर यांच्या कुटुंबियांचा सत्कार करण्यात आला. सौ. काकडे यांच्या हस्ते परीक्षक उद्धव कानडे यांचा सत्कार झाला. पद्माकर कुलकर्णी यांनी माधव पवार यांचा परिचय करून दिला. यानंतर पुरस्कार प्रदान करण्यात आला. उद्धव कानडे यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. यानंतर पुरस्कार विजेते कवी माधव पवार यांनी आपले मनोगत व्यक्त केले. सौ. आसावरी काकडे यांनी अध्यक्षीय समारोप केला. प्रा. मिलिंद जोशी यांनी आभार मानले.

**दि. २३ मे २०१० : श्रद्धांजली सभा :** कै. वि. म. कुलकर्णी व डॉ. तारा वनारसे यांना श्रद्धांजली सभा आयोजित करण्यात आली होती. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले. स्वाती महाळंक यांनी वि. म. कुलकर्णी यांच्या काही कवितांचे वाचन केले. मृणालिनी वनारसे यांनी डॉ. तारा वनारसे यांच्या 'तिळातिळा दार उघड' या पुस्तकातला एक उतारा वाचून दाखविला. डॉ. कल्याणी दिवेकर, डॉ. श्यामला वनारसे, कै. वि. म. कुलकर्णी यांचे तीन चिरंजीव, सरिता पदकी यांनी श्रद्धांजलीपर भाषणे केली. शेवटी डॉ. माधवी वैद्य

यांनी श्रद्धांजलीपर आपले विचार प्रकट केले. उपस्थितांनी दोन मिनिटे उभे राहून श्रद्धांजली वाहिली.

**दि. २६ मे २०१० : वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पारितोषिक वितरण समारंभ :** समारंभास अंजली महागांवकर यांनी गायलेल्या शारदा स्तवनाने प्रारंभ झाला. स्थानिक कार्यवाह नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले.

सुधीर गाडगीळ व सी. व्ही. कवठेकर यांच्या हस्ते रु. १,००,०००/- चा धनादेश ८३ व्या अ. भा. सा. संमेलनातर्फे डॉ. माधवी वैद्य यांच्याकडे सन्मानपूर्वक प्रदान केला. कार्याध्यक्ष डॉ. वि. भा. देशपांडे यांनी प्रास्ताविक केले.

यावेळी व्यासपीठावर पत्रिका संपादक डॉ. सु. प्र. कुलकर्णी, कोषाध्यक्ष श्री. ह. ल. निपुणगे, प्र. का. डॉ. माधवी वैद्य व स्था. कार्यवाह नंदा सुर्वे व प्रमुख पाहुणे ह. मो. मराठे उपस्थित होते. पुष्पगुच्छ देऊन ह. मो. मराठे यांचे स्वागत श्री. निपुणगे यांनी केले. मराठेंचा परिचय डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी करून दिला.

यानंतर पारितोषिक वितरण सोहळा ह. मो. मराठे यांच्या हस्ते झाला. देणगीदारांपैकी लालन सारंग यांनी मनोगत व्यक्त केले.

डॉ. श्रीखंडे, अरुण म्हात्रे, डॉ. अनिल सहस्रबुद्धे, रत्नाकर मतकरी या पारितोषिक प्राप्त व्यक्तींनी आपले मनोगत व्यक्त केले.

यानंतर परीक्षा विभागाच्या कार्यवाह डॉ. स्नेहसुधा कुलकर्णी यांनी निवेदन केले. यंदाच्या परीक्षांमध्ये यशस्वी झालेल्या विद्यार्थ्यांना पारितोषिके प्रदान करण्यात आली. तसेच संबंधीत शिक्षकांचा श्रीफल व फूल देऊन सत्कार करण्यात आला. यानंतर प्रमुख पाहुणे ह. मो. मराठे यांचे समारोपाचे भाषण झाले. शेवटी ह. ल. निपुणगे यांनी आभार मानले.

**दि. २७ मे २०१० : १०४ व्या वर्धापन दिन :** स्वाती महाळंक यांनी सूत्रसंचालन केले. अध्यक्षस्थानी विद्या बाळ होत्या. परिषदेचे अध्यक्ष द. मा. मिरासदार व कोषाध्यक्ष ह. ल. निपुणगे हे व्यासपीठावर उपस्थित होते. प्र. कार्यवाह डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. विद्या बाळ यांचा परिचय डॉ. कल्याणी दिवेकर यांनी करून दिला. सन्मानचिन्ह व पुस्तक देऊन प्रा. द. मा. मिरासदार यांनी विद्या बाळ यांचा व डॉ. वैद्य यांनी प्रा. मिरासदार यांचा सत्कार केला. श्री. मधू नेने यांनी डॉ. विश्वनाथ खैरे यांचा परिचय करून दिला. विद्या बाळ यांनी डॉ. विश्वनाथ खैरे यांचा सन्मानचिन्ह सन्मान पत्र व रु. ५०००/- रोख व श्रीफल देऊन परिषदेच्या 'जीवन गौरव' पुरस्कार प्रदान करण्यात आला. नंतर नंदा सुर्वे यांनी मंदा खांडगे यांचा परिचय करून दिला. नंतर विद्या बाळ यांच्या हस्ते भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार रु. १०००/- सन्मानचिन्ह व श्रीफल देऊन सौ. खांडगे यांना प्रदान करण्यात आला. यानंतर डॉ. विश्वनाथ खैरे व मंदा खांडगे यांनी आपले विचार प्रकट केले. शेवटी विद्या बाळ यांनी अध्यक्षीय विचार प्रकट केले. शेवटी डॉ.पुरूषोत्तम काळे यांनी आभार मानले.

कार्यवृत्त नोंद : **दीपक करंदीकर**
स्वीकृत सदस्य, मसाप, पुणे

❖❖❖

## कोरेगाव शाखा

**२७ जून २००९ : कै. प्रा. डॉ. मिरदेव गायकवाड स्मृतिदिन :** साजरा करण्यात आला.

**२ ऑगस्ट २००९ : कादंबरीकार ना. हा. आपटे ग्रंथ पुरस्कार सोहळा :**

साहित्यिक योगिराज वाघमारे, प्रा. सीताराम सावंत, डॉ. श्रीपाद नीळकंठ कात्रे यांचे उपस्थितीत साजरा झाला.

**२ ऑगस्ट २००९ : आण्णा भाऊ साठे स्मृतिदिन :**

रहिमतपूर येथे 'आण्णा भाऊ साठे जीवन चरित्र' या विषयावर प्रा. व. ना. बोधे यांचे व्याख्यान झाले.

**१५ नोव्हेंबर २००९ : कादंबरीकार ना. ह. आपटे स्मृतिदिन :** कोरेगाव येथे प्रिं. डॉ. राजेंद्र शेजवळ, ॲड. विजयराव कणसे, डॉ. श्रीपाद निळकंठ कात्रे यांचे उपस्थितीत पार पडला.

**१२ डिसेंबर २००९ :** रहिमतपूर येथे कविसंमेलन आयोजित करण्यात आले. प्रिं. विवेक रणखांबे, पत्रकार अविनाश कदम, यांची प्रमुख उपस्थिती होती.

**१३ फेब्रुवारी २०१० : परिसंवाद :** प्रा. डॉ. बाळासाहेब शंकर शिंदे, औंध यांच्या 'कोंडमारा' कादंबरीवर परिसंवाद आयोजित करण्यात आला.

❖❖❖

## उल्हासनगर शाखा

**२८ फेब्रुवारी २०१० : मराठी भाषादिन :**
दरवर्षीप्रमाणे, हस्तलिखित स्पर्धा, काव्यचित्र स्पर्धा, लोकनृत्य स्पर्धा घेण्यात आल्या.



## भिवंडी शाखा

**८ जानेवारी २०१० :** श्रीरंग घाटे यांचे 'नर्मदा प्रदक्षिणा' या विषयावर व्याख्यान झाले.

**२ एप्रिल २०१० :** सौ. वीणा देव आणि त्यांचे सहकारी यांनी कै. गो. नी. दांडेकर यांच्या 'मृण्मयी' या कादंबरीचे अभिवाचन केले.

## डोंबिवली शाखा

**३ एप्रिल २०१० :** कै. पु. भा. भावे जन्मशताब्दी निमित्त 'मला दिसलेले भावे' या विषयावर श्रीराम शिधये यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक पु. स. ओक यांनी केले. प्रा. प्रभात शिरसेकर यांनी आभार मानले. सौ. मीना गोडखिंडी यांनी सूत्र संचालन केले.

**४ एप्रिल २०१० :** 'स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या छायेत' या विषयावर डॉ. सच्चिदानंद शेवडे यांचे भाषण झाले. प्रास्ताविक डॉ. मीनाक्षी ब्रह्मे यांनी केले. सौ. स्मिता तळेकर यांनी सूत्रसंचालन केले. सौ. मेघना कुलकर्णी यांनी आभार मानले.



## अक्कलकोट शाखा

नुकतीच मसापच्या अक्कलकोट शाखा स्थापनेच्या दृष्टीने श्री. पद्माकर कुलकर्णी यांनी पुढाकार घेऊन सभासदांची सभा घेण्यात आली. त्यांत अध्यक्षपदी सौ. शैलशिल्पा अरुण जाधव यांची तर प्रमुख कार्यवाहपदी शिरीष सुभेदार यांची सर्वानुमते निवड करण्यात आली. सौ. आरती काळे - उपाध्यक्ष, प्रा. भीमराव साठे-कार्याध्यक्ष, सिद्धाराम काळे-कार्यवाह, शंकर पवार-कोषाध्यक्ष, कार्यकारिणी सदस्य-ॲड. प्रशांत शहा, नागनाथ सुरवसे, सपना पाटील, आप्पाराव पाटील, डॉ. विद्युलता पांढरे, पुष्पा हरवाळकर, सुखदा ग्रामोपाध्ये, राजेश पडवळकर, बापूजी निंबाळकर यांची निवड करण्यात आली. ही निवड २०१० ते २०१५ या पाच वर्षांसाठी आहे. असे सोलापूर जिल्हा प्रतिनिधी श्री. पद्माकर कुलकर्णी कळवितात.



## मावळ शाखा (तळेगाव दाभाडे)

**२ जानेवारी २०१० :** राम गणेश गडकरी, ग. दि. माडगूळकर, सुधीर फडके यांचे स्मृतीप्रित्यर्थ प्रा. सुरेश अत्रे यांचे व्याख्यान झाले.

**१६ जानेवारी २०१० :** विद्या विद्वांस, श्री. पैठणक, नयनी ताम्हणे यांचे कथाकथन आयोजित करण्यात आले. या कथा स्वलिखित होत्या.

**६ फेब्रुवारी २०१० :** श्रीनिवास साठे, श्री. पैठणकर, सौ. सरोजिनी दीक्षित यांच्या स्वलिखित कथांचे कथाकथन झाले.

**२० फेब्रुवारी २०१० :** कवी बा. भ. बोरकर स्मृतिचित्र-काव्य सौ. यशोधरा साठे व श्री. सुरेश अत्रे यांनी सादर केले.

**६ मार्च २०१० :** विनीता ऐनापुरे यांचे कथाकथन झाले.

**८ मार्च २०१० :** जागतिक मराठी दिन कविसंमेलनाद्वारे साजरा करण्यात आला. आशिष पाठक, प्रा. सुरेश अत्रे, डॉ. पांडुरंग भानुशाली, अरविंद सोवनी, श्रीनिवास साठे, सौ. यशोधरा साठे, सौ. सरोजिनी दीक्षित यांनी सहभाग घेतला.

**२० मार्च २०१० :** 'कुसुमाग्रज चरित्र-काव्य नाट्य' हा कार्यक्रम सादर करण्यात आला. यात रवींद्र आभाळे, प्रा. सुरेश अत्रे, सौ. यशोधरा साठे यांचा सहभाग होते.

**१७ एप्रिल २०१० :** कुसुमाग्रजांचे साहित्य-विविध समीक्षकांच्या दृष्टिकोनातून या विषयावर डॉ. पांडुरंग भानुशाली यांचे व्याख्यान झाले व श्री. सतीश साठे यांचे कविता वाचन झाले.

**२८ एप्रिल २०१० :** इ. ८वी ते १२वी पर्यंतच्या विद्यार्थ्यांची वैज्ञानिक विषयावरील निबंध लेखन स्पर्धा आयोजित करण्यात आली होती. असे कार्यवाह सतीश साठे कळवितात.



## श्रीरामपूर शाखा

**'गुरूनानक देव-शोध व बोध' वर व्याख्यान :**

श्रीरामपूर महाराष्ट्र परिषद शाखेचे अध्यक्ष ॲड. रावसाहेब शिंदे यांच्या मार्गदर्शनानुसार व उपाध्यक्ष अविनाश आपटे यांच्या अध्यक्षतेखाली म. सा. प. शाखेत डॉ. अशोक कामत यांच्या गुरूनानक देव-शोध व बोध ग्रंथावर डॉ. कमलजित कौर बतरा यांचे व्याख्यान झाले.

कामगार सदन येथे आयोजित केलेल्या या व्याख्यानाचे स्वागत व प्रास्ताविक कार्यवाह प्रा. सौ. भाग्यश्री बडे यांनी केले. सूत्रसंचालन प्रमुख कार्यवाह प्रा. डॉ. बाबुराव उपाध्ये यांनी केले.

या परिसंवादात कार्याध्यक्ष प्राचार्य टी. ई. शेळके, दिनकरराव पोखरकर, शिवाजी काळे, अशोक बनकर, सौ. श्यामला द्रवीड, प्रा. सौ. मंजिरी सोमाणी, सौ. सुरेखा कासार, कचरू बोरूडे, विजयराव नगरकर आदिंनी भाग घेतला. डॉ. कमलजित कौर बतरा यांना मैत्रग्रुप अहमदनगरचा पुरस्कार लाभल्यावद्दल ठरावाद्वारे अभिनंदन करण्यात आले.

**दि. ३ मे २०१० : 'ध्यासपर्व' वर व्याख्यान संपन्न :**

श्रीरामपूर येथील महाराष्ट्र साहित्य परिषद शाखेतर्फे ॲड. रावसाहेब शिंदे लिखित 'ध्यासपर्व' या आत्मकथनपर ग्रंथावर शिवाजी एकनाथ काळे यांचे संशोधकीय व्याख्यान संपन्न झाले.

लेखक व म. सा. प. शाखेचे अध्यक्ष ॲड. रावसाहेब शिंदे यांच्या प्रमुख उपस्थितीत संपन्न झालेल्या या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी ग्रामीण साहित्यिक नामदेवराव देसाई होते. प्रमुख कार्यवाह प्रा. डॉ. बाबुराव उपाध्ये यांनी स्वागत व प्रास्ताविक करून कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले. प्रमुख पाहुणे म्हणून प्राचार्य डॉ. शंकरराव गागरे, के. एल्. खाडे, दिनकरराव पोखरकर, प्रा. सौ. मंजिरी सोमाणी, कचरू बोरूडे आदि उपस्थित होते.

अध्यक्षीय सूचना कार्याध्यक्ष माजी प्राचार्य टी. ई. शेळके यांनी केली. अशोकराव बनकर यांनी अनुमोदन दिले. कामगार सदन येथे झालेल्या या कार्यक्रमाचे आयोजन व नियोजन उपाध्यक्ष अविनाश आपटे यांनी केले. या कार्यक्रमास पन्नास सदस्य उपस्थित होते. या उपक्रमाचे अनेकांनी कौतुक केले.

शिवाजी काळे यांनी ॲड. रावसाहेब शिंदे यांचे १९४२ च्या आंदोलनातील योगदान, ग्रामीण विद्यार्थी, कष्टकरी, शेतमजुरांसाठी दिलेले लढे, समाजसेवा, उद्योगशीलता, व्यवसायातील मोठेपणा, म. गांधी, साने गुरूजी, कर्मवीर भाऊराव पाटील, बाबा आमटे इत्यादींच्या विचारकार्यातील सहभाग यांसबंधी वैशिष्ट्ये सांगितली. या उपक्रमात अनेकांनी सूचना मांडल्या. प्राचार्य शेळके यांनी आभार मानले.

**प्रा. डॉ. उपाध्ये,**
कार्यवाह

❖❖❖

## धुळे जिल्हा शाखा

**१८ ऑगस्ट २००९ :**

मसाप धुळे जिल्हा शाखा व स्त्री शिक्षण संस्था धुळे यांच्या संयुक्त विद्यमाने- स्व. राजमाता पद्माराजे रघुजीराव कदमबांडे स्मृतीनिमित्त कविवर्य श्री. कमलाकर देसले यांच्या 'काव्यवाचना'चा कार्यक्रम कमलाबाई कन्या हायस्कूल, धुळे येथे आयोजित केला होता. श्री. कमलाकर देसले यांनी आपल्या विविध विषयावरील कविता सादर करताना 'आई' या विषयावरील कवितांना त्यांनी अधिक प्राधान्य दिले. स्त्री शिक्षणसंस्थेच्या अध्यक्षा सौ.अलकाताई बियाणी यांनी अध्यक्षीय समारोप केला. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक मसाप, धुळे शाखेच्या अध्यक्षा प्रा. सुलभाताई भानगावकर यांनी केले. आभार श्री. मोहन मोरे यांनी मानले. परिचय प्रा. डॉ. शशिकला पवार यांनी केला तर सूत्रसंचालन प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे यांनी केले. या कार्यक्रमास विद्यार्थिनी व रसिकांचा उत्तम प्रतिसाद मिळाला.

**दि. २१ नोव्हेंबर २००९ :**

ग्रामीण साहित्य लेखक स्व. डॉ. अनंतराव पाटील स्मृतीनिमित्त मसाप व गरुड वाचनालय, धुळे यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. दिलीप चव्हाण यांचा 'कथावाचना'चा कार्यक्रम आयोजित केला होता. या



अनुक्रमणिका

कार्यक्रमात प्रा. दिलीप चव्हाण यांनी स्व. डॉ. अनंतराव पाटील व सुप्रसिद्ध लेखक रंगनाथ पठारे यांच्या कथांचे वाचन केले. अध्यक्षीय स्थान मसाप, धुळे शाखेचे उपाध्यक्ष श्री. सी. वं. रावळे यांनी भूषविले. प्रमुख पाहुणे म्हणून गरूड वाचनालयाचे सरचिटणीस श्री. मधुकर नेरकर व्यासपीठावर उपस्थित होते. प्रास्ताविक प्रा. डॉ. शशिकला पवार यांनी केले, आभार प्रा. डॉ. सुरेंद्र मोरे यांनी मानले. या कार्यक्रमास साहित्यप्रेमी व स्व. अनंतराव पाटील यांचा परिवार मोठ्या संख्येने उपस्थित होता.

**दि. १ फेब्रुवारी २०१० :**

स्व. डॉ. शांताराम (भाऊ) देशपांडे यांच्या स्मृती 'विद्यार्थ्यांच्या आत्महत्या' या विषयावर परिसंवादाचे आयोजन करण्यात आले होते. या परिसंवादात 'कविता-रती'चे संपादक प्रा. पुरुषोत्तम पाटील, सुप्रसिद्ध विचारवंत डॉ. मु. ब. शहा, स्त्रीशिक्षण संस्थेच्या (धुळे) अध्यक्षा सौ. अलकाताई वियाणी, मानसोपचार तज्ज्ञ डॉ. तुषार भट, हृदयरोग तज्ज्ञ डॉ. मंदार म्हसकर, पत्रकार श्री. निखिल सूर्यवंशी, कु. केतकी म्हसकर (विद्यार्थिनी) इ. मान्यवर सहभागी झाले होते. या परिसंवादात विद्यार्थ्यांच्या आत्महत्येमागील कारणे व त्यावरील उपाय यावर विचारमंथन झाले. स्त्रीशिक्षणसंस्थेचे उपाध्यक्ष प्रा. पी. डी. दलाल (सी.ए.) यांनी अध्यक्षीय समारोप केला. प्रास्ताविक प्रा. सुलभाताई भानगावकर यांनी केले. सूत्रसंचालन प्रा. दिलीप चव्हाण यांनी केले तर आभार प्रा. डॉ. शशिकला पवार यांनी मानले. कमलाबाई कन्या शाळेत आयोजित या परिसंवादांस पालक, विद्यार्थी व विद्यार्थिनी यांची लक्षणीय उपस्थिती होती. प्रश्नोत्तरामुळे चर्चा अधिकच रंगली.

**दि. २७ फेब्रुवारी २०१० :**

'मराठी दिन' व ज्ञानपीठ पुरस्कार विजेते कुसुमाग्रज यांच्या आठवणी निमित्त दलाई नामा यांच्या मूळ कवितेचा शोभा भागवत (पुणे) यांनी अनुवाद केलेली 'आपल्या काळात' ही कविता झेरॉक्स करून धुळ्यातील विविध महाविद्यालये व हायस्कूल येथे भित्तीपत्रकावर लावण्यासाठी मसाप तर्फे वितरित करण्यात आली. शिवाय ही कविता स्थानिक वृत्तपत्रातूनही प्रसिद्ध करण्यात आली. विद्यार्थ्यांनी व रसिकांनी वाचावी अशी ही कविता आहे.

*आपल्या काळात इमारतींची उंची वाढली*
*पण माणुसकीची कमी झाली, का ?*
*रस्ते रुंद झाले; पण दृष्टी अरुंद झाली, का ?*

या कवितेत प्रेषक तळेगांव (स्टेशन) जि. पुणे येथील श्री. शरद गोपाळ नुलकर हे आहेत.

**दि. १ एप्रिल २०१० :**

स्व. विद्याधर वैद्य स्मृतीदिनानिमित्त 'काव्यवाचना'चा कार्यक्रम आयोजित केला होता. या कार्यक्रमात 'कविता-रती'चे संपादक प्रा. पुरुषोत्तम पाटील, प्रा. दिलीप चव्हाण, सुप्रसिद्ध रंगकर्मी (धुळे) श्री. यादव खैरनार यांनी ज्ञानपीठ पारितोषिकाने सन्मानित स्व. विंदा करंदीकर व स्व. कवीवर्य दिलीप चित्रे यांच्या कविता सादर केल्या व या दोघांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. श्री. यादव खैरनार यांनी विंदांच्या 'थोडी सुकी, थोडी कष्टी', 'स्थानगीत', 'साठीचा गझल' या कविता, प्रा. दिलीप चव्हाण यांनी दिलीप चित्रे यांच्या 'जीभ', 'हरवले जेथे ज्ञानदेव तुकाराम', 'या पुढचं महाराष्ट्रगीत', 'ही साली सवय' या कविता सादर केल्या. अध्यक्षीय समारोप करताना प्रा. पुरुषोत्तम पाटील यांनी विंदा व दिपु यांच्या स्मृती जागवल्या. या दोन्ही महाकवींनी मराठीला दिलेल्या अभूतपूर्व योगदानाचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला. त्यांनी विंदांच्या 'विरुपिका', 'शपथ तुला', 'झपताल' तर दिपुंच्या 'जीभ', 'देवा अशी ग्रंथी दे' या कविता सादर केल्या. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रा. डॉ. शशिकला पवार यांनी केले. आभार डॉ. सुरेंद्र मोरे यांनी मानले. गरुड वाचनालयात आयोजित या कार्यक्रमास सरचिटणीस श्री. मधुकर नेरकर प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. या कार्यक्रमाच्या आयोजनास मसापच्या अध्यक्ष प्रा. सुलभा भानगावकर व उपाध्यक्ष श्री. सी. बं. रावळे यांचे सहकार्य लाभले. याही कार्यक्रमास साहित्यप्रेमी रसिकांचा उत्तम प्रतिसाद लाभला.

**प्रा. डॉ. शशिकला पवार**
कार्याध्यक्ष, मसाप, धुळे.



## इस्लामपूर शाखा

**१ जानेवारी २०१० :** अठरावे मराठी साहित्य संमेलन आणि लोकनेते राजारामबापू पाटील राज्यस्तरीय उत्कृष्ठ वाङ्मय निर्मिती पुरस्कार सोहळा मंगळवार दि. १२ जानेवारी २०१० रोजी तीन सत्रात अठरावे मराठी साहित्य संमेलन व उत्कृष्ट वाङ्मय निर्मिती पुरस्कार सोहळा पार पडला.

प्रथम सत्रात स्वागताध्यक्षा सौ. वृषाली आफळे यांच्या स्वागतपर मनोगताने संमेलनाची सुरवात झाली. या संमेलनाचे उद्घाटक माजी संचालक महाराष्ट्र राज्य लघुउद्योजक विकास मंडळाचे मा. रामराव देशमुख यांनी आपल्या मनोगतात लेखकांकडून वास्तव चित्र डोळ्यासमोर वाचकासमोर आणावे असे विचार व्यक्त केले. या संमेलनाचे अध्यक्ष ज्येष्ठ ग्रामीण साहित्यिक मा. प्रा. मोहन पाटील यांनी मराठी साहित्य रसिक व लेखक यांच्याकडून साहित्याची उंची वाढवणाऱ्या अपेक्षा व्यक्त केल्या. या सत्रात श्रीमती वैजयंती पेठकर यांच्या 'फणा', 'यसवदा' या कादंबरीच्या दुसऱ्या आवृत्तीचे प्रकाशन मान्यवरांच्या हस्ते झाले. यावेळी मा. श्री. कृष्णा खोत यांच्या 'रौदाला' कादंबरीस उत्कृष्ट वाङ्मय पुरस्कार तर कवी ऋत्विज काळसेकर यांच्या 'काळोखाच्या तळाशी' या कवितासंग्रहास प्रथम प्रकाशन पुरस्कार प्रमुख मान्यवरांच्या उपस्थितीत मा. शामराव पाटील व मा. मोहन पाटील यांच्या हस्ते देण्यात आला.

दुसऱ्या सत्रात सुप्रसिद्ध कवी मा. सतीश काळसेकर यांची प्रकट मुलाखत प्राचार्या डॉ. दीपा देशपांडे व प्रसिद्ध कवी आनंद विंगकर यांनी घेतली.

तिसऱ्या सत्रात कवी सुरेश मोहिते यांच्या अध्यक्षतेखाली नवोदित कवी व मान्यवर कवींचे कवीसंमेलन झाले.

**५ मार्च २०१० :** राजाराम बापू ज्ञानप्रबोधिनी व मराठी साहित्य परिषद इस्लामपूर शाखेतर्फे देण्यात येणाऱ्या लोकनेते राजारामबापू पाटील उत्कृष्ट वाङ्मय निर्मिती पुरस्काराची घोषणा यावेळी करण्यात आली. हा पुरस्कार कादंबरी, कथा, कविता वैचारिक आणि संकीर्ण या वाङ्मय प्रकारासाठी देण्याचे निश्चित केले. यावर्षी कथा या वाङ्मय प्रकारास पुरस्कार देण्यात यावा. पुरस्काराचे स्वरूप ७ हजार रुपये रोख, मानपत्र, शाल-श्रीफळ असून १ जानेवारी २००५ ते ३१ डिसेंबर २००९ या पाच वर्षात प्रकाशित होणाऱ्या पुस्तकांचा विचार केला जावा. तसेच १ जानेवारी २००९ ते ३१ डिसेंबर २००९ या कालावधीत नवोदित लेखकाच्या प्रथम प्रकाशनास ५ हजार रुपये रोख मानपत्र सन्मानचिन्ह, मानपत्र शाल-श्रीफळ देऊन गौरवण्यात यावे अशी घोषणा ज्येष्ठ सदस्य राजारामबापू बँकेचे चेअरमन प्रा. शामराव पाटील यांनीकेली. या चर्चेत प्रा. शामराव पाटील, प्राचार्या दीपा देशपांडे, सौ. वृषाली आफळे, श्री. धोंडीराम सलगर, प्रा. दशरथ पाटील, श्रीमती वैजयंती पेठकर, श्री. शिवाजी कुंभार आदि सर्वच सदस्यांनी भाग घेतला.

**१५ मार्च २०१० :** ज्येष्ठ साहित्यिक ज्ञानपीठ पुरस्कार विजेते विंदा करंदीकर यांना मराठी साहित्य परिषद इस्लामपूर यांच्या वतीने श्रद्धांजली वाहण्यात आली.

यावेळी मधुकर हसबनीस प्रा. शामराव पाटील, सौ. नंदिनी साळुंखे, डॉ. दिपक स्वामी, डॉ. श्री. वि. द. कदम आदिंनी मनोगते व्यक्त केली. या कविश्रेष्ठ विंदा करंदीकर यांच्या अनेक आठवणींना उजाळा देण्यात आला.

सौ. वृषाली आफळे व डॉ. गोरख मंद्रूपकर यांनी 'विंदावन' या कार्यक्रमातील भावस्पर्शी कविता आपल्या सुमधुर आवाजात वाचल्या.

या बैठकीस श्री.डी.आर. सलगर, श्री.पंढरीनाथ शेवाळे, श्रीमती वैजयंती पेठकर, श्री. निपाणीकर आदींसह साहित्यक्षेत्रातील मान्यवर व विंदावर/विंदाच्या साहित्यावर प्रेम करणारे मराठी रसिक उपस्थित होते. सर्वांनी भावपूर्ण वातावरणात विंदाना श्रद्धांजली अर्पण केली.

**३१ मार्च २०१० :** डॉ. विवेक देशपांडे स्मृतिदिनानिमित्त प्रा. विजय पोहनेरकर व प्रा. रविंद्र मगर यांचा 'हसू आणि आसू' हा कार्यक्रम झाला. 'दोन नोटा', 'ढेकूण', 'मी गाव का सोडलं', 'आहेराची साडी', 'माहेर', 'डास' या कवितांनी मंत्रमुग्ध केले.

प्रा. शामराव पाटील यांनी स्वागत केले. साहित्यपरिषदेच्या कार्याध्यक्ष सौ. वृषाली आफळेनी प्रास्ताविक केले. प्राचार्य दीपा देशपांडेनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. प्रा. आर. बी. शिंदेनी आभार मानले.

कार्यवाह

❖❖❖



अनुक्रमणिका

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

| | | |
|---|---|---|
| खंड १ ला | | रु. ५००/- |
| खंड २ रा | (भाग १) (अद्ययावत पुरवणीसह दुसरी आवृत्ती) | रु. ७००/- |
| | (भाग २) (अद्ययावत पुरवणीसह दुसरी आवृत्ती) | रु. ७००/- |
| खंड ३ रा | | रु. ३५०/- |
| खंड ४ था | | रु. ४००/- |
| खंड ५ वा | (भाग १) | रु. ३५०/- |
| | (भाग २) | रु. ३५०/- |
| खंड ६ वा | (भाग १) | रु. ३५०/- |
| | (भाग २) | रु. ३००/- |
| खंड ७ वा | (भाग १) | रु. ७००/- |
| | (भाग २) | रु. ८००/- |
| | एकूण | रु. ५५००/- |

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनाही रु. ४१२५/-**

डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने
रेल्वे अगर एस.टी. पार्सलने पाठवू.

(वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट.
व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपाल खर्च वेगळा.)

मागणीसाठी संपर्क

## महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे-४११०३०.. दूरभाष : ०२०-२४४७५९६३.

अनुक्रमणिका

